# केल्याने देशाटन

रोहिणी गोरे



Rohini Gore
2416 Strawberry Court,
Edison, New Jersey-08817
U.S.A.

Whatsapp - 1-828-674-8631

Gmail : gore.rohini@gmail.com

Blog address : http://rohinivinayak.blogspot.com /
उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म
http://rvgore.blogspot.com / स्मृति

ह्या पुस्तकातले सर्व फोटो ( Including cover/back page ) मी माझ्या डिजिटल कॅमेराने काढलेले आहेत.

# मनोगत

प्रिय वाचकहो, नमस्कार, मी रोहिणी गोरे. ‘केल्याने देशाटन‘ हे पुस्तक प्रकाशित करताना मला खूप आनंद होत आहे. केमिस्ट्री मधे संशोधन करण्याकरता विनायक व त्याच्याबरोबर मी, मे २००१ साली अमेरिकेत आलो. आयुष्यात पहिल्यांदाच मी विमानात बसले ते अमेरिकेत येण्यासाठी! टेक्सास राज्यातल्या कमी लोकवस्ती असलेल्या डेंटन शहरात आल्यावर प्रदुषणमुक्त हवा आणि खूप शांतता जाणवत होती. माझ्या हातून लेखन होईल असे मला वाटले नव्हते. अमेरिकेत आल्यावर ते माझ्या हातून घडले. त्याला कारणेच तशी होती. एक तर खूप शांतता होती. बोलायला कुणी नाही. इथे सर्वच्या सर्व कामे आपली आपल्यालाच करायला लागतात. सर्व कामे करून झाल्यावर सुद्धा रिकामपण यायचे. सुरवातीच्या काळात रिकामपण आले असले तरी काही जणांच्या ओळखी झाल्या आणि मैत्री वाढली. एकमेकांकडे जाणे-येणे सुरू झाले. इतकेच नव्हे तर जेवणावळी सुरू झाल्या. मित्रमंडळात दक्षिण व उत्तर भारतीय होते. आम्हीच फक्त मराठी होतो. शिवाय इतर देशातले म्हणजे पाकिस्तान, चीन, श्रीलंका, साऊथ आफ्रीका, युरोप मध्ये राहणारे की जे अमेरिकेत शिक्षण/नोकरी व्यवसाया करता आले होते, त्यांच्याशी पण मैत्री झाली. आम्ही सर्व जण विद्यापीठाच्या आजुबाजूच्या परिसरातल्या अपार्टमेंटमध्ये राहत होतो. ही सर्व मजा जेव्हा विनायक विद्यापीठात संशोधन करायचा तेव्हाची होती.

जेव्हा विनायकला नोकरी लागली त्या शहरात मात्र मित्रमंडळ जमले नाही. भारतीय खूपच तुरळक संख्येने होते . त्यामुळे इंडियन स्टोअर, उपाहारगृह व मराठी मंडळ नव्हते. ते खूपच दुरवर होते! दरम्यान एका म्युझिक ग्रुपवर एकाने संकेतस्थळाबद्दल माहिती दिली होती. तिथे मराठीत लिहितावाचता येते हे कळाल्यावर मला खूप आधार वाटला. मनोगत या मराठी संकेतस्थळाचे

आम्ही दोघे सदस्य झालो व तिथल्या मराठी मित्रमैत्रिणींची ओळख झाली. अर्थात हे सर्व जण अमेरिका, युरोप, भारत या ठिकाणचे होते. आम्ही रहात असलेल्या शहरात कोणी नव्हते. पण तरीही याहू मेसेंजर द्वारे मी खूप जणांशी बोलत राहिले. असे वाटले की आपण प्रत्यक्षात भेटलो की काय!

मनोगत या मराठी संकेतस्थळावर अनेक लेख, पाककृती, कविता व चर्चा घरबसल्या संगणकावर मला वाचता यायच्या. सुरवातीला मी मला आवडलेल्या लेखनावर अभिप्राय लिहीत असे. तिथे एकदा 'दडपे पोहे' या पाककृतीची विचारणा झाली असता त्याची कृती मी आधी वहीत लिहिली आणि मग मनोगताच्या पाककृती विभागात टंकली. त्यावर लगेचच अभिप्राय आले आणि त्यानंतर माझा लिहिण्याचा उत्साह इतका वाढला की मी रोज संध्याकाळी जे खायला करायचे त्याची कृती लगेचच मनोगतावर टंकायला लागले. त्यानंतर भारतातल्या आठवणी व इथे अमेरिकेत आलेले सर्व अनुभव एकेक करत लिहीत गेले. मी आधी वहीत लिहिते. त्यामुळे माझ्याकडे बऱ्याच लिखाणाच्या वह्या झाल्या आहेत. नंतर मी माझ्या ब्लॉगवर लिहायला सुरवात केली. सोशल मिडिया वर बऱ्याच ग्रुपची सदस्य झाले आणि माझ्या लिखाणाला वाव मिळाला. लिखाणाला वाव मिळाला म्हणजे असे की काही वेळा ग्रुपवर एखाद्या रेसिपीची विचारणा व्हायची आणि ती जर माझ्या ब्लॉगवर असेल तर मी लगेचच त्याची लिंक द्यायचे. पाककृती स्पर्धेत आणि काही ग्रुपवर होणाऱ्या निबंध स्पर्धेत भाग घ्यायला लागले. माझे लेखन माझ्या ब्लॉग द्वारे जगभरात राहणाऱ्या बऱ्याच भारतीयांपर्यंत पोहोचले.

स्मृतिवर लिहिलेले 'माझे अमेरिकेतील अनुभव' या लेबल मधले जवळपास सर्व लेख मी पुस्तकात घेतले आहेत. अमेरिकेत आलेले सर्व अनुभव पुस्तक रूपाने मला जास्तीत जास्त वाचकांपर्यंत पोहोचवायचे आहेत म्हणून

पुस्तक बनवण्याचा घाट घातला.या पुस्तकात मी अमेरिकेत आलेल्या अनुभवांचे विस्तृत वर्णन केले आहे. अमेरिकेत आल्यावर सुरवातीचे दिवस कसे होते, अपार्टमेंटमध्ये राहायला आल्यावर आमचे दैनंदिन जीवन कसे बदलले, एका शहरातून दुसऱ्या शहरात स्थलांतर करताना काय काय गोंधळ झाले, मी केलेल्या नोकऱ्यांचे वेगवेगळे अनुभव असे क्रमाक्रमाने सर्व लिहिले आहे. सर्वात मुख्य म्हणजे विल्मिंग्टन शहरात आम्ही १० वर्षे राहिलो.त्या काळात प्रत्यक्षामधले कोणतेही मित्रमंडळ नसताना मी काय काय उद्योग करत राहिले ते ते सर्व लिहिले आहे.

नंतर विनायकच्या दुसऱ्या नोकरीनिमित्ताने आम्ही हेंडरसनविल शहरात आलो आणि माझे वेगळ्या प्रकारचे विश्व निर्माण झाले. मी वेगळ्या प्रकारची नोकरी केली आणि खूपच व्यग्र होऊन गेले. नोकरी केल्याने माणसात आल्यासारखे वाटले. इथेही भारतीय जास्त नव्हतेच. इंडियन स्टोअर आणि उपाहारगृह तासाभराच्या कार ड्राईव्ह वर आल्याने महिन्यातून एकदा टिपिकल भारतीय भाज्या आणायला लागलो. हेंडरसनविल हे शहर पण कमी लोकवस्ती असलेले होते. आजूबाजूला सर्व ठिकाणी डोंगर आणि त्यावर उंच उंच झाडे होती. हे ठिकाण खूप उंचावर असल्याने भरपूर वारा होता. रस्ते सर्वत्र नागमोडी वळणाचे होते. या शहरात कायम राहवेसे वाटत होते इतके हे शहर निसर्गाने नटलेले आहे. यावर एक वेगळा लेखही लिहिला आहे.

काही प्रेक्षणीय स्थळे पाहण्यासाठी आम्ही आमच्या कारमधून प्रवास केला. त्या प्रवासाची वर्णने लिहिली आहेत. शिवाय आमचा पहिलावहिला लांब पल्याचा कारप्रवासाचा अनुभव खूपच वेगळा होता ! इंगल्स स्टोअर मध्ये जी नोकरी केली आणि ती नेमकी वेगळी कशी होती याबद्दलचा सविस्तर लेख या पुस्तकात आहे. स्मृतिवर माझे इतरही बरेच लिखाण आहे. इतर लेखनाचे एकेक पुस्तक होईल व त्याची शीर्षके माझ्या मनात घोळत असतात. शीर्षके आहेत ती अनुक्रमे ‘आठवणींच्या हिंदोळ्यावर‘ ‘गेले ते दिन गेले‘

‘तळं‘ ‘स्मृतिपटलावरची काही पाने‘ ‘टंकलेखन‘ इत्यादी! त्यापैकी एक पुस्तक मी ‘वास्तु‘ नावाने प्रकाशित करत आहे.

पुस्तकातले अनुभव वाचताना तुम्हाला ते नक्कीच आवडतील याबद्दल मला खात्री आहे ! वाचल्यावर तुमचा अभिप्राय मला जरूर कळवावा ही नम्र विनंती !



# अनुक्रमणिका

## क्रमाक्रमाने दिलेल्या फोटोंची शीर्षके

डेंटन - टेक्सास

१. आम्ही ज्या घरात राहिलो ती घरे व तळे क्लेम्सन-साऊथ कॅरोलायना

२. या घरात आम्ही फक्त ३ महिने राहिलो होतो

३. बस मधून आम्ही बाय-लो ग्रोसरी स्टोअर मध्ये जायचो

४. Wachovia बँकेत मी माझे सॅलरी चेक भरायचे

५. पाळणाघरातली मुले विल्मिंग्टन - नॉर्थ कॅरोलायना

६. नदीवर फिरताना दिसलेला चंद्र व आकाशातले रंग

७. नदीवरचा सूर्यास्त

८. समुद्रकिनाऱ्यावरचा सूर्योदय

९. आमच्या घरात साजरे केलेले सण व पाककृती

१०. अपार्टमेंटच्या आवारातून दिसणारा सूर्योदय व फॉलमधले झाड

११. तळ्याच्या काठावर उमललेली सुंदर फुले

१२. ग्रंथालयाकडून मला मिळालेले प्रशस्तिपत्रक

१३. हँगिंग रॉकचे ओबडधोबड खडक

१४. ब्रायसन सिटीमधली Nanthahala नदी व आगगाडी

१५. भव्यदिव्य चिमनी रॉक हेंडरसनविल - नॉर्थ कॅरोलायना

१६. शहरातले निसर्गसौंदर्य

१७. गवतावरची चिमुकली सुंदर फुले

१८. इंगल्स स्टोअर व तिथे मी बनवलेली बटाटा भजी

१९. पानगळीचे रंग

२०. ॲपल फेस्टिवलमध्ये विक्रीकरता ठेवलेली सफरचंद

२१. अपार्टमेंटच्या आवारातून दिसलेला ढगांचा नयनरम्य नजारा

२२. संध्याकाळी खिडकीतून दिसलेले रंगीत ढग

२३. डाऊनटाऊन

२४. आम्ही डोंगरावर असलेल्या घरात राहात होतो

२५. व्हिजिटर सेंटरची आकर्षक पाटी

# १) अमेरिकेत पाऊल पडल्यावर

अमेरिकेतल्या डॅलस विमानतळावर विनायकचे प्राध्यापक ॲलन आम्हाला न्यायला आले होते. हस्तांदोलन करून अवाढव्य बॅगांसकट आम्ही त्यांच्या कारमध्ये बसलो. प्राध्यापक खूपच बोलके होते. त्यांच्या व विनायकच्या गप्पा सुरू होत्या.मी मात्र मागच्या सीटवर बसून 'कुठून आलो या परक्या देशामध्ये !!' अश्या अवस्थेत होते.कार डेंटन शहरकडे धावत होती.त्यांच्या घरी आल्यावर त्यांची चिनी बायको नॅन्सी हिने हसतमुखाने आमचे स्वागत केले. त्यांच्या बंगल्या शेजारीच एक छोटा बंगला आहे तिथे आमची राहण्याची व्यवस्था झाली.नॅन्सीने आम्हाला कुठे काय ठेवले आहे हे सांगितले आणि '' थोडी विश्रांती घेऊन जेवायला या ''असेही सांगितले.दुसऱ्या दिवशी प्राध्यापकां बरोबर विनायक सकाळी ८ लाच न्याहरी करून विद्यापीठात गेला. आता फक्त मी व नॅन्सी.नॅन्सी खूप बोलकी होती त्यामुळे मला खूपच बरे वाटले. त्यांच्या शेजारचा बंगला थोडे दिवस का होईना आमचा होता ! तिने मला फ्रीज मध्ये काय काय आहे हे सांगितले आणि ते संपले की मला सांगा म्हणजे मी तुम्हाला ते आणून देईन असेही सांगितले. फ्रीजमध्ये nonfat milk, no sugar added ice cream, apple juice , orange juice होते आणि शिवाय बाहेर ओट्यावर चहा, साखर, कॉफी हे पण होते. नॅन्सी जरी गपिष्ट होती आणि मला तिने कधी एकटी पडू दिले नाही तरी काही वेळा ती तिच्या वैयक्तिक कामाकरता बाहेर पडायची तेव्हा मला खूप एकटेपणा जाणवायचा. त्यावेळेला मी घरात रहायचे नाही. त्यांच्या घरासमोर एक भलेमोठे तळे होते, त्या तळ्याच्या काठावर मी उभी रहायचे.लाटांकडे बघायचे. त्या लाटांकडे बघता बघता मला भारतातल्या सर्वांची इतकी काही आठवण यायची की गदगदून रडू फुटायचे.लाटांना डोळ्यात साठवत रहायचे. शून्यात नजर लावून त्या लाटांकडे बघायचे ,जणूकाही मी त्या लाटांशी बोलायचे. त्या तळ्याला मी अजूनही

विसरणे शक्य नाही. भारतातून अमेरिकेत येण्याआधी झालेली धावपळ, गडबड यामुळे प्रचंड दमणूक झाली होती आणि इथे आल्यावर एकदम शांतता, स्वच्छ हवा व भरपूर वेळ!! ऐसपैस पलंगावर पडून ढाराढूर झोपावेसे वाटत होते पण झोप काही केल्या येत नव्हती. एकतर त्या बंगल्याच्या दारावर बेल नसल्यामुळे नॅन्सी आली आणि तिने दारावर 'टकटक' केले तर ते आपल्याला ऐकू येईल का ? या भीतीने झोप यायची नाही आणि डोळे मिटले की मुंबईतली गर्दी आणि आईबाबांचे चेहरे दिसायचे.इतक्या मोठ्या बंगल्यात अजिबात करमायचे नाही.एकदा तळ्यावर चक्कर, एकदा बागेत झाडांना पाणी घालून, एकदा नॅन्सी काय करते हे बघायला तिच्या दारावर टकटक.हे सर्व करून घरी परत आले की माझा मलाच खूप राग यायचा.कितीही काही केले तरी वेळ पटापट का जात नाहीये आणि एकदम मला आठवण झाली
' की अरे आपण कॅमेरा आणला आहे की !! ' मग मात्र वेळ कसा घालवायचा हा प्रश्न मिटला. मग काय नुसते खटाखट फोटो काढत राहिले.फूल दिसले, काढ फोटो! पान दिसले काढ फोटो!

आम्ही ज्या छोट्या बंगल्यात राहत होतो तिथे फोन दिसत होता, पण विचारायचे कसेना की आम्हाला घरी बोलायचे आहे म्हणून. ईमेलने खुशाली कळवली होती पण फोनवर बोलणे वेगळेच असते ना ! दिवस खूपच संथ गतीने जात होते. त्या रिकामटेकड्या वेळामध्ये मी सासूसासरे व आईबाबा यांना सविस्तर पत्रे लिहिली.नुसती पत्रेच लिहिली नाहीत तर त्या पत्राची पारायणे केली. कल्पना केली, आपल्या आईच्या दारात माझे पत्र पडेल. मग आई ते उचलून बाबांना म्हणेल, बर का हो! आपल्या रोह्याचे पत्र आले आहे.मग बाबा म्हणतील, हो का! काय म्हणतेय?! मग दोघे मिळून माझे पत्र वाचतील व त्यांच्या चेहऱ्यावरचे उमटलेले भाव मला इतक्या हजारो मैल दूर राहून पण पोहोचतील. नॅन्सीला सांगितले की मला पत्र पोस्ट करायची आहेत. ती म्हणाली की ती चीनमध्ये राहणाऱ्या तिच्या आईवडिलांना पत्र लिहीते. तिला तिच्या मातृभाषेत पत्र लिहायला आवडतात.

मनात म्हणाले की ही अगदी माझ्यासारखीच दिसते.मला पण मराठीतून पत्र लिहायला खूपच आवडते!

संध्याकाळी ८ ला ऍलन व विनायक घरी आले की लगेचच जेवण! जेवणाच्या वेळेस मात्र आमच्या चौघांच्या गप्पा खूप रंगायच्या.त्यातून ॲलन यांच्याकडे बरेच भारतीय संशोधन करण्यासाठी येवून गेले असल्याने त्यांना बऱ्यापैकी भारतीय खाद्यपदार्थांची माहिती होती आणि चक्क त्यांना डोसा प्रिय होता.मला विचारले तुला डोसा येतो का? मी आनंदाने हो येतो की !! लगेच नॅन्सीने मला विचारले की डोसा कसा करायचा ते सांग, त्यासाठी काय काय लागते वगैरे. तिच्याकडे चक्क तांदुळ व काही डाळी होत्या, काही भारतीय मसाले पण होते! तिला रेसिपी सांगितली.डोश्याची लांबलचक रेसिपी तिला आवडलेली नसावी, तिचा चेहराच सांगत होता.डाळ तांदुळ भिजले, पण ते १०-१२ तासानंतर वाटले गेले नाहीत. दुसऱ्या दिवशी सकाळी वाटले गेले. तात्पुरते त्यातले पाणी काढून फ्रीजमध्ये ठेवले.डाळ तांदुळ वाटून १०-१२ तासांनी ते फसफसले पण! मग म्हणाली की उद्या करायचे का डोसे? परत पीठाची रवानगी फ्रीजमध्ये! शेवटी एकदाचे तिसऱ्या दिवशी ते डोसे झाले. खरेतर तांदुळाची धिरडीच लागत होती, कारण ज्या प्रमाणात उडीद डाळ पाहिजे त्याप्रमाणात ती नव्हती. ऍलन यांनी मात्र आवडीने डोसे खाल्ले. उकडून बटाट्याची भाजीपण केली होती. त्यांनी ती भाजी डोश्यामध्ये घातली.त्याचा सँडविचसारखा चौकोनी आकार केला व आपण सँडविच कसे खातो त्याप्रमाणे त्यांनी डोसे खाल्ले. नॅन्सीला मात्र डोसे आवडले नाहीत.

५-६ दिवसांनी आमचे अपार्टमेंट फिक्स झाले. एक दिवस त्या दोघांनी आम्हाला भारतीय उपाहारगृहात जेवण दिले.काही जरूरीच्या गोष्टी घेण्यासाठी आम्ही काही दुकानातून हिंडलो. एक दिवस त्या दोघांनी आम्हाला परत सर्व सामानासकट पोहोचते केले. अच्छा बायबाय टाटा करत त्यांनी आमचा निरोप घेतला. साधारण आठवडाभर आम्ही त्यांच्याकडे होतो.अमेरिकेतला हा अनुभव खूपच वेगळा होता आणि संस्मरणीय ठरला!!

# २) २०६ ईगलड्राईव्ह मधले १ वर्षाचे वास्तव्य

२२ मे २००१ रोजी संध्याकाळच्या सुमारास आम्ही आमच्या अपार्टमेंटमध्ये प्रवेश केला.या अपार्टमेंटच्या शेजारच्या अपार्टमेंटमध्ये एक भारतीय कुटुंब राहत होते. आमच्या अपार्टमेंटचा नंबर होता २०५ आणि शेजारी २०६ होते. ईगलड्राइव्ह नावाचे हे अपार्टमेंट कॉम्प्लेक्स (complex) विद्यापीठाच्या चालण्याच्या अंतरावर होते. २०५ नंबरच्या अपार्टमेंटमध्ये आम्ही  फक्त ८ दिवसच राहणार होतो. त्यानंतर आम्ही २०६ मध्ये जाणार होतो. तसे म्हणायला गेलेतर २०६ हे आमचे अमेरिकेत आल्या आल्या महिन्याभराच्या आत दुसरे स्थलांतर! २०५ मध्ये आल्यावर अमेरिकेतल्या घरी राहण्याची सुरवात झाली. २०६ मध्ये तमिळ कुटुंब राहत होते. ती मैत्रिण मला म्हणाली आज रात्री तुम्ही आमच्याकडेच जेवा, दुसऱ्या दिवशीपासून तुमच्या घरात तुमचे नवीन रुटीन सुरू करा. त्या दिवशी रात्री आयते जेवण मिळाले ते एका दृष्टीने बरेच झाले. नवीन घरात रात्री काही करायला उत्साह नसतोच. त्या कुटुंबात एक शाळेत जाणारी मुलगी होती .तिथे जेवायला गेलो तर ती मुलगी माझ्या मांडीवर येऊन बसली. मला खूप छान वाटले. तिने जेवणही छान बनवले होते.पोळीभाजी बरोबर तिने डोसाही बनवला होता. तसे अमेरिकेत आल्यावर ८ दिवस आम्ही प्राध्यापकांच्या बंगल्याच्या शेजारच्या छोट्या बंगल्यात राहत होतो पण तिथे भारतीय जेवण नव्हते. त्यामुळे या मैत्रिणीच्या घरी घरचे छान जेवण जेवल्यावर बरे वाटले.जेवण करून घरी आलो. पिवळ्या बल्बमधले मिणमिणते दिवे आणि जागेमध्ये एकही फर्निचरचा तुकडा नाही.हे अपार्टमेंट फर्निश्ड नव्हते.इथल्या अपार्टमेंटमध्ये दोन प्रकार असतात एक तर फर्निचर असते नाहीतर अजिबात नसते. फर्निचर जरी असले तरी ते बरेच जणांनी वापरून जुनाट झालेले असते.

झोपायचे होते पण गादी नव्हती. या घरात रहायला येण्या आधी प्राध्यापक ॲलन मर्चंड यांनी आम्हाला सॅम्सक्लबमध्ये नेले होते.सॅम्सक्लब

हे अमेरिकेतले अवाढव्य दुकान आहे. इथे घाऊक माल विकत घ्यावा लागतो व वर्षाचे पैसे एकदम भरून त्या दुकानाचे सदस्यत्व घ्यावे लागते. इथे आम्ही काही गरजेच्या वस्तू खरेदी केल्या. त्यात २२ किलो तांदुळाचे पोते व ९ किलो मैदा घेतला. मैदा म्हणजे ऑलपरपज फ्लोअर. हवा भरून तयार करता येईल अशी एक गादी घेतली. त्या गादीत हवा भरून ती फुगवली व त्यावर भारतातून आणलेल्या दोन चादरी घालून झोपलो. उशाला काही नव्हते. झोप येता येत नव्हती. आपण इथे फक्त दोघेच्या दोघेच आहोत याचा एकाकीपणा खूप जाणवत होता. भारताची आठवण येत होती. दुसऱ्या दिवशी सकाळी उठून जवळच असलेल्या दुकानातून चहा, साखर, तेल, कांदेबटाटे, भाज्या, टुथब्रश, टुथपेस्ट, साबण असे सर्वकाही आणले. इलेक्ट्रिकच्या शेगड्या, अरूंद स्वयंपाकघर, मिणमिणते दिवे, अंघोळीकरता अरूंद टब सर्वकाही नवीनच होते. अंघोळ करताना तर सुरवातीला छोटी बादली व त्यात एक ग्लास टाकून भारतात अंघोळ करतो तशी केली. शॉवरच्या पाण्याने केस ओले न होता अंघोळ करायला एकदोन दिवसातच जमवले. मला इथले एक आवडले ते म्हणजे नळाला गरम व गार पाणी दोन्ही होते. त्यामुळे मनसोक्त अंघोळ करता येत होती. इलेक्ट्रिकच्या शेगडीवर चहाला लागणारा वेळ, कूकरला लागणारा वेळ हे काही पचनी पडत नव्हते. सुरवातीला जवळजवळ १५ दिवस आम्ही मैद्याच्या म्हणजेच ऑलपरपज पीठाच्या पोळ्या खात होतो. पोहे उपमे याची तीव्रतेने आठवण येत होती. संध्याकाळी विनायक लॅबमधून घरी यायचा तेव्हा खायला काय करायचे याचा प्रश्न पडत होता. सुरवातीला बटाट्याची भजी मैदाच्या पीठात बुडवून तळली. सॅक अँड सेव्ह हे आमचे अमेरिकेतील पहिले दुकान जिथे आम्ही ग्रोसरी आणण्याकरता सुरवात केली. ग्रोसरी हा शब्दही इथे आल्यावरच कळला ! कळला म्हणजे वाण्याचे सामान, भाजीपाला, दूध  इतरकाही घेण्या करता जिथे जायचे ते म्हणजे स्टोअरमधे  ग्रोसरी आणण्याकरता जायचे! फोडणी साठी मोहरी हिंग हळद शेजारणीने दिले.मुंबईत असताना मी वाण्याची यादी फोनवरून

सांगत होते.दोन तासात सामान घरपोच. शिवाय दूध, पेपर घरपोच. नंतर कामवाली येऊन सगळे कामही करून जाते. केराचा डबा घराबाहेर ठेवला की झाले.इथे सर्व विरूद्ध. सर्वच्या सर्व कामे आपणच करा. इथल्या दुकानामध्ये सुरवातीला आपल्याला लागणाऱ्या वस्तू व सामान कुठे ठेवले आहे हे सापडवायलाच वेळ लागतो इतकी इथली दुकाने मोठी असतात. या दुकानामध्येच मग सुरवातीला संध्याकाळच्या खाण्यामध्ये केक, चीप्स आणायला लागलो. मल्टीग्रेन नावाचा ब्रेड कॉफीत बुडवून छान लागायचा. कामवालीची गैरहजेरी तर खूपच जाणवत होती. या आठ दिवसामध्ये दिवस जाता जात नव्हते. एक दिवस मावळून दुसरा दिवस येईपर्यंत असे वाटायचे की खूप काळ लोटला आहे जणू! सुरवातीला भारतात फोन नाही, टीव्ही नाही, फर्नीचर नाही, वाचायला पुस्तके नाहीत. शेजारी व आमच्या खाली एक असे दोन भारतीय कुटुंबे राहत होती पण त्यांच्याकडेही पटकन उठून जावे असे मनात येऊनही जाता येत नव्हते. संभाषणही इंग्रजीमध्येच कारण की त्या दोघींना हिंदी बोलता येत नव्हते त्यामुळे बोलायचे पण समाधान होत नव्हते. आम्ही दोघे मराठीतून बोलत होतो त्याचाच मला खूप आधार वाटत होता. भारतातल्या सर्व सुखसोयी सोडून इथे उगाचच आलो असे वाटायला लागले. कोणीतरी शिक्षा केल्यासारखेच वाटत होते. त्यातल्या त्यात एक होते की विनायक दुपारी जेवायला घरी येत होता त्यामुळे स्वयंपाकात वेळ जायचा व संध्याकाळी चहाला आला की परत लॅबमध्ये सुरवातीच्या आठ दिवसात तरी गेला नाही. संध्याकाळी मराठी बातम्या टीव्हीवर पाहण्याची खूप सवय होती तेही खूप जाणवत होते. गॅलरीत उभे राहून परत घरात यायचे. घरात आले आणि एखाद्या कार येण्याचा आवाज आला की लगेच परत बाहेर यायचे. असे वाटायचे की आपल्याकडेच कुणीतरी आले आहे. २०५ च्या बेडरूममध्ये तर मी कधीच फिरकले नाही. बाहेरच्या खोलीचे दार उघडे ठेवायचे. गॅलरीत उभे राहून बाहेर पाहिले की इथे कोणीही राहत नाही असे वाटायचे कारण की

सर्वांची दारे बंद. रस्त्यावर कोणी दिसायचे नाही. सगळे रस्ते सुनसान. आम्ही उन्हाळ्याच्या सुट्टीत इथे रहायला आलो होतो त्यामुळे कुठेही कसलीही रहदारी किंवा माणसे दिसत नव्हती. बरेच विद्यार्थी भारत दौऱ्यावर गेले होते आणि अमेरिकन्स त्यांच्या घरी गेले होते.

हळूहळू रूळत होते. माहिती करून घेत होते. एकदा शेजारणीचे दार उघडे होते म्हणून डोकावले तर तिची सामानाची बांधाबांध चालली होती. तिला म्हणाले की तुला काही मदत हवी असेल तर सांग पण तरीही तिने कोणत्याही प्रकारची मदत घेतली नाही. खाली राहणारी मैत्रिण तिच्या मुलाला घेऊन अधूनमधून माझ्याकडे येत होती पण तिचीही जुजबी ओळख असल्याने जास्त बोलणे होत नव्हते. एके दिवशी आम्ही तिघी मिळून ग्रोसरीला गेलो तर मला खूप छान वाटले. आधार वाटला.२०६ मधल्या कुटुंबाची जाण्याची तयारी होत होती. त्यांना आम्ही जेवायला बोलावले.जाताना तिने मला काही काचेच्या बरण्या व प्लॅस्टीकचे डबे दिले. २०६ अपार्टमेंटमध्ये आम्ही रहायला जाणार होतो. २०६ मध्ये जे भारतीय कुटुंब राहत होते त्यांना राहती जागा सोडून दुसऱ्या शहरात वास्तव्यासाठी जायला भाग पडले म्हणून आम्ही त्यांच्या अर्धवट मोडलेल्या करारावर सह्या करून तिथे रहायला जाणार होतो. असे केल्याने त्यांचे बरेच पैसे वाचणार होते. अमेरिकेत अपार्टमेंटमध्ये राहण्यासाठी अपार्टमेंटच्या ऑफीसमध्ये जाऊन एका करारावर सही करावी लागते. काहीही कारणाने जर करार मोडला गेला तर उरलेल्या सर्व महिन्यांचे भाड्याचे पैसे भरावे लागतात. शिवाय डिपॉझिट रक्कमही परत मिळत नाही. हा करार वर्षाचा करावा लागतो.

२०६ मध्ये जाण्याचा निर्णय आम्ही घेतला कारण की त्या जागेत जरूरी पुरते सर्वसामान होते. बेड, टेबल, टीपॉय, एक फिरती खुर्ची.

अर्थात हे सामान त्या कुटुंबाचेही नव्हते.त्याजागेत आधी जे कोणी राहून गेले होते ते त्यांनी तसेच त्या जागेत सोडले होते. ही जागा विद्यापीठ,भाजीपाल्याचेदुकान, व धुण्याच्या दुकानापासून चालण्याच्या अंतरावर होती.विचार केला की आपल्याकडे व्हीसा एक वर्षाचाच आहे.वर्षानंतर इथे राहिलो तर दुसरी जागा बघू.पण वर्षाच्या आत आम्ही डेंटन सोडले. २०६ मध्ये राहणाऱ्या फॅमिलीला टाटा केले व आम्ही २०६ नंबरच्या अपार्टमेंटमधे आलो. हा वर्षाचा काळ खूप मजेत गेला.नंतर अजून २ ते ३ कुटुंबे आली. आमच्याकडे कार नसल्याने आणि इंडियन स्टोअर पण खूप लांब असल्याने एकदा प्रविणा व श्रीनिवास आम्हाला दोघांना त्यांच्याबरोबर कारने इंडियनस्टोअर मध्ये घेऊन गेले व आम्ही तिथून बरेच सामान घेतले. सर्व प्रकारच्या डाळी, कणकेचे पोते घेतले. शिवाय पोहे, रवा, डाळीची आणि इतर पिठेही घेतली.काही इंडियन भाज्याही घेतल्या (तोंडली, गवार, शेपू इत्यादी) मोहरी, हिंग. हळद पण घेतले. कारण की भारतीय स्वयंपाकात सर्व काही लागतेच. आमची कार्ट पूर्णपणे भरून गेली होती.

सत्या दुसऱ्या शहरात गेल्यावर मी व प्रविणाच होतो. आम्ही दोघी दुपारच्या एकमेकींकडे जाऊन गप्पा मारायचो. गप्पांमध्ये चहा असायचा व बरोबर बटाटाचिप्स. काहीवेळेला आम्ही जिन्यात बसून गप्पा मारायचो. त्या अपार्टमेंटमध्ये बाहेरून जिने होते.ती माझ्याकडे बरेच वेळा कांदा, बटाटा वगैरे उसने मागायची. आम्ही दोघींनी असेच काही चमचमीत बनवले तर ते एकमेकींकडे द्यायचो. वेगवेगळ्या पदार्थांची वेगळी चव असलेले पदार्थ आम्हाला दोघींना खूप आवडायचे . त्यावेळेला मी कोबीची भजी खूप करायचे .थोडे दिवसांनी आम्हाला कविता नावाची तेलगू मैत्रिण मिळाली.ती खूप अबोल होती.तिचे मित्रमंडळी म्हणजे टी.व्ही व कॉंप्युटर होत. तिला बाकीच्या जगाशी काही घेणेदेणे नसायचे. तिच्या घरी गेले की मात्र चांगले बोलायची पण लक्ष मात्र पूर्ण टी.ही बघण्यात

`

असायचे. नंतर नंतर आमच्या तिघींचे खाण्याचे पदार्थ द्यायलाघ्यायला सुरवात झाली. कविता रेसिपी वाचून पदार्थ बनवायची. तिच्या हातची पदार्थांची चव खूप छान होती.नंतर काही दिवसांनी आम्हाला माधवी नावाची तेलगू मैत्रिण मिळाली. तिची व माझी दोस्ती जास्त जमली कारण की तिला व मला बडबड करायला खूप आवडायचे. दिवसातून खूप वेळेला आम्ही फोनवरून बोलायचो. बोलण्याचा विषय अमेरिका किती बोअर आहे आणि भारत किती चांगला आहे हाच असायचा.असे बोलले की आम्हाला खूप बरे वाटायचे. बोलण्यातून 'बोअर' शब्द आला की आम्ही खूप हसायचो व म्हणायचो की आपण किती वेळा वापरतोना बोअर हा शब्द ! मी तिला विचारले की तू तुझा वेळ कसा घालवतेस तर तिने सांगितले की मी सर्व आवरून व स्वयंपाक करून ९ वाजता संगणकावर बसते याहूवर चॅटिंग करायला ती १२ ला उठते. त्यावेळी तिचे भारतातले मित्रमैत्रिणी याहू मेसेंजर वर बोलायला यायचे. नंतर ३ ते ५ ती तिच्या अमेरिकेतल्या बहिणींशी चॅटिंग करायची. तिच्या नवऱ्याला चॅटिंग केलेले अजिबात आवडायचे नाही.मी पण तिला माझे रुटीन सांगितले की सकाळी रेडिओवर गाणी ऐकता ऐकता स्वयंपाक. विनायक घरी आला की जेवण व थोडी डुलकी काढून कोक पिऊन ग्रंथालयात व येताना विनायकच्या लॅबमध्ये जाऊन दोघे परत येतो. नंतर काहीतरी खायला करून परत विनायक लॅबमध्ये गेला की रेडिओ ऐकता ऐकता पत्रे लिहिते. त्यावेळेला डॅलसवरून २४ तास हिंदी गाणी रेडिओवर प्रसारित व्हायची म्हणून आम्ही वालमार्ट मधून रेडिओ कम टेपरेकॉर्डर विकत आणला.

मी भारतातल्या मैत्रिणींना, सासूसासरे, आईबाबा, बहीण यांना पत्र लिहीते हे ऐकून तिला खूप छान वाटले. माझी पत्र लिहिण्याची कल्पना तिला आवडली व तिने पण काही पत्रे लिहीली. विद्यापीठातच एक छोटे पोस्टऑफीस होते. मला ते खूप आवडायचे. आमची पत्रे लिहून तयार झाली की एकमेकींना फोन करून पोस्टऑफीसमध्ये यायचो पत्र टाकायला. मी माझ्या भाची आणि

पुतणीसाठी वाढदिवसाची ग्रीटींगही पोस्टाने पाठवते हे ऐकून पण तिला छान वाटले. या पत्र टाकण्याच्या निमित्ताने आम्ही दोघी भेटायचो, बोलायचो. दुपारचे जेवण झाले की आम्ही यायचो पोस्टऑफीसमध्ये. नंतर चालत कधी ती माझ्याकडे यायची किंवा मी तिच्याकडे जायचे. आमच्या घराशेजारी मॅकडोनाल्ड होते. तिथे आम्ही व्हेजबर्गर खायचो. तिच्या घरी गेलो की ती कॉफी करायची व एकीकडे चिप्स आणि रेडिओवर गाणी ऐकायचो. गप्पा तर कायम असायच्याच आमच्या. तिलाही रेडिओवर गाणी ऐकायला आवडायची. तिला पदार्थ बनवून खाण्यात रस नव्हता. प्रविणाने एकदा बुंदी लाडू बनवले व मला दिले व कविताला दिले. आम्हाला दोघींनाही ते खूप आवडले म्हणून एकदा आम्ही तिघींनी मिळून आमच्या तीन फॅमिलीज करता बुंदीलाडू बनवले होते.प्रविणाला मी केलेले समोसे खूप आवडायचे. एकदा कविताने व्हेजमँच्युरियन केले. नंतर तिला रेसिपी विचारून आम्ही दोघींनी पण बनवले.

काही दिवसांनी एक छोटे बांगलादेशी शॉप सुरू झाले.तेथून आम्ही चित्रपटांच्या कॅसेट आणायचो. जी कॅसेट आणेल तिने ती सर्वांना द्यायची व मग नंतर परत करायची.एकdollar ला एक विडिओ कॅसेट मिळायची. आम्ही तिघी प्रत्येकी एकेक कॅसेट आणायचो. म्हणजे एका dollar मधे आम्हाला ३ सिनेमे बघायला मिळायचे. त्यात एकदा मी 'कैरी' सिनेमाची कॅसेट आणली होती. प्रविणाला 'कैरी' खूप आवडला. इंग्रजीमध्ये कॅप्शन्स लिहून यायचे म्हणून तिला हा सिनेमा कळाला. एकदा कविताने 'लगान' चित्रपटाची कॅसेट आणली होती. तेव्हा लगान नवीन होता त्यामुळे ती कॅसेट दुसऱ्या दिवशी लगेच परत करायची होती म्हणून मग आम्ही सर्वांनी मिळून 'लगान' चित्रपट कविताच्या घरी पाहिला. तिघींच्याही घरी वेगवेगळी जेवणे झाली. नंतर मी सगळ्यांना जेवायला बोलावले व मराठमोळा स्वयंपाक

केला व सांगितले आज अजिबात भात खायचा नाही, पोळ्या खा ! मी एकदा प्रविणाला विचारले की तुम्ही जेवणात भातच भात कसा काय खाता? तर तिने सांगितले की भाताबरोबर आम्ही रसम, सांबार, दोन भाज्या असे सर्व काही करतो व प्रत्येका बरोबर भात खातो, व सर्वात शेवटी दहीभात खातो.खरतर मला भात जास्त आवडत नाही पण एकदा तिने सांगितलेल्या पद्धतीने सर्व काही केले आणि चक्क मी भरपूर भात खाल्ला!

मोठ्या पडद्यावर सिनेमा पहायला मला खूप आवडते .मलाही ! माधवी म्हणाली. जायेंगे क्या? हाहा क्युँ नही !! मी म्हणाले २००१ साल. माझी आणि माधवीची मैत्री झालेली. बरेच काही केले आम्ही दोघींनी मिळून. इंडियन असोसिएशन तर्फे विद्यापीठाच्या एका हॉलमध्ये सिनेमे दाखवले गेले नाताळच्या सुट्टीत. बोचऱ्या थंडीत आणि स्नो पडत असतानाही आम्ही दोघी आमच्या घरातून चालत चालत हॉलवर पोहोचत होतो शिणुमा पहायला! रात्रीचा शो असल्याने जेवून निघायचो. चार सिनेमे पाहिले. त्यात दोघींचे एकेक आवडते पिक्चर्स. डीडीएलजे, माधवीचा आवडता तर चुपकेचुपके माझा आवडता . शाहरूख माधवीचा आवडता नट.डीडीएलजे पाहताना अगदी एकटक डोळे लावून बघत होती.( मी मनातल्यामनात ‘त्या माकडतोंड्याला इतके काय निरखून पहायचे? पसंद अपनी अपनी) मी मात्र अधूनमधून डुलकी घेत होते. चुपके चुपके साठी माझे कान टवकारलेले. एकही डायलॉग मिस होता कामा नये, नाहीतर सिनेमा पाहण्यात अर्थ नाही. या सिनेमाला मात्र माधवी जांभया देत होती. त्यावेळी स्मार्टफोन काय तर साधे मोबाईलपण नव्हते. त्यामुळे फोनचा व्यत्यय नाही. हॉलमध्ये जास्तीचे सिनेमा प्रेमी नाहीत. लगानला मात्र बरीच टाळकी जमा झालेली. हा सिनेमा पाहताना आम्ही ३ ते ४ वेळेला उठलो, चला संपला एकदाचा म्हणेपर्यंत परत बसलो.अजून कितीवेळ? असे आमच्या दोघींचे उद्गार.

ये दोनो भी आमीरसे क्युँ प्यार करते है रे! ये सब दिखानेकी क्या

जरूरत है! और गाने भी इतने लंबेलंबे क्युँ ? आमच्या दोघींची अशीही शेरेबाजी! एका गाण्यात आमीर बरोबर दोघी प्रेमात पडलेल्या आणि आपल्याच धुंदीत दाखवलेल्या .आम्ही दोघी एकमेकींकडे बघून स्माईली देत होतो.सरतेशेवटी कंटाळून आम्ही दोघीही उठलो आणि म्हणालो अभी कुछ भी होने दो यार. ये मुव्ही तो रातभर भी चलेगा! त्या दिवशी माधवी मला तिच्याघरी घेऊन गेली आणि मला हैद्राबादी बिर्याणी खाऊ घातली .रंगीला मात्र आम्ही दोघींनीही एन्जॉय केला. त्या दिवशी सिनेमा संपल्यावर परत येताना स्नोफॉल सुरू झाला होता.माझे घर थोडे लांब होते. कडाक्याची थंडीतर होतीच. पण चालत येताना चिटपाखरूही नव्हते. काळाकुट्ट अंधार पसरलेला होता. रात्रीचे १२ वाजले होते.मनातून जाम टरकले होते.रामनामाचा जप सुरू केला. खूप भराभर चालूनही रस्ता संपता संपत नव्हता. नजरेच्या टप्प्यात घर आले. रस्ता क्रॉस केला.आणि अक्षरशः पळतपळत येऊनच घरात शिरले.माधवीला फोन केला‘ मी पोहोचले गं घरी ‘....

डेंटनमधला एक वर्षाचा काळ खूप छान गेला.अमेरिकेतले चारही ऋतू अनुभवले. स्प्रिंगमधली स्वच्छ हवा, कडक उन्हाळा, फॉलमधले बोचरे वारे, मुसळधार पाऊस आणि हाडे गोठवणारी थंडी.



# ३) गोंधळात गोंधळ

सकाळी मित्रमैत्रिणींचा निरोप घेऊन आम्ही निघालो डॅलस विमानतळावर. आमचे दोन मित्र आम्हाला विमानतळावर सोडणार होते. सामान बरेच असल्याने दोन कार कराव्या लागल्या. अर्धा संसार USPS तर्फे पाठवला व अर्धा आमच्या चार बॅगांमधे. निघण्याच्या वेळी रविने जाळ्यावर विमान कोणत्या गेटवरून सुटणार आहे ते बघून त्याने तसे श्रीनिवासला सांगितले. श्रीनिवास अवाजवी आत्मविश्वासात म्हणाला,' होहो. मला माहीत आहे सर्व. मी आत्तापर्यंत बऱ्याच जणांना विमानतळावर सोडले आहे.' आमच्या कार निघाल्या. एका कारमधे मी व श्रीनिवास व दुसऱ्या कारमधे रवि व विनायक. विमान दुपारी साडेबाराचे होते म्हणून २ तास आधी निघालो. एक तास जाण्यामधे व एक तास सामानाची क्ष किरण तपासणी याकरता. श्रीनिवास व मी ११ ला विमानतळावर पोहोचलो व रवि-विनायकची वाट पाहू लागलो. साडे अकरा व्हायला आले तरी ह्यांचा पत्ता नव्हता. श्रीनिवास ३-४ वेळा शोधायला गेला त्यांना. तसे रवि-विनायक पण वेळेवर पोहोचले होते विमानतळावर. ते पण आम्हाला शोधत होते. शोधता शोधता भेटले एकमेकांना त्या अवाढव्य विमानतळावर कोणाकडेही जागोजागी भटकणारे दूरध्वनीयंत्र नव्हते. गंमत काय झाली होती की रवि ज्या गेटवरून विमान सुटणार त्या गेटवर उभे होते. श्रीनिवास व मी चुकीच्या गेटवर उभे होतो. श्रीनिवासच्या अवाजवी आत्मविश्वासामुळे सगळा गोंधळ उडाला होता. आम्ही दोघे काउंटरवर गेलो तेव्हा तेथील बाई म्हणाली, 'आता १२ वाजले आहेत. तुमच्या सामानाची क्ष किरण तपासणी होईपर्यंत एक तास जाईल.तुमचे विमान चुकले आहे. पण मी तुमच्या करता एक काम करू शकते.जास्तीचे पैसे न घेता तुम्हाला शिकागो तर्फे ग्रीनवीलचे बुकींग करून देते.' आता परत सगळा उलटा प्रवास करण्यापेक्षा वेळ जास्त लागला तरी चालेल म्हणून आम्ही लांबचा

पल्ला पत्करून जाण्याचा निर्णय घेतला. श्रीनिवास रविला टाटा बायबाय केले आणि परत काउंटरपाशी येऊन उभे राहिलो सामानाची क्ष किरण तपासणी करायला. एक गोंधळ संपल्यावर दुसरा गोंधळ सुरू झाला. त्यावेळी ११ सप्टेंबरच्या अमेरिकेवरील अतिरेकी हल्यामुळे एकूणच विमानतळावरची तपासणी व्यवस्था खूपच कडक झाली होती. चार बॅगांमधला भरलेला संसार उलथापालथा केला गेला.

आमचे विमानउड्डाण असे काहीसे होते. ३ ते ५ डॅलस-शिकागो, शिकागोला ३ तासांच्या अवधीनंतर ८ ते १० शिकागो ते ग्रीनवील असे दुसरे उड्डाण. विमानतळावरील धावपळ संपल्यावर आम्ही थोडे खाऊन घेतले आणि प्राध्यापकांना दूरध्वनी करून आन्सरिंग मशीनवर निरोप ठेवला की ' आमचे विमान चुकले आहे, त्यामुळे दुपारी ३ च्या ऐवजी रात्री ११ च्या सुमारास आम्ही ग्रीनवीलला पोहोचत आहोत.' आणि डॅलस-शिकागो विमानात प्रवेश केला. शिकागो विमानतळावर पहिल्या प्रथमच आम्हाला अमेरिकेतील विविध माणसांची गर्दी दिसली. आता विमानतळावर तीन तास थांबावे लागणार होते. मला गर्दी पाहून खूप आनंद झाला. त्या गजबजलेल्या विमानतळावर तीन तास कसे गेले ते कळलेच नाही. विनायकला सामानापाशी बसवून मी मनसोक्त हिंडून घेतले विमानतळावर. सरकती पायवाट व सरकते जिने यावरून फिरले. प्रत्येक विमान आले की गर्दीचा लोंढा इकडून तिकडे जात होता. बरीच विमाने जमिनीवरून आकाशाकडे व आकाशातून जमिनीकडे झेपावताना पाहिली. काचेच्या तावदानातून विमानतळाच्या बाहेरील दृश्य सहज दिसत होते की जेथून विमाने प्रत्यक्षात उडतात. बरीच वर्दळ असते तिथे. वर्दळीचे निरिक्षण करताना लक्षात आले की तेथील कर्मचारी खूपच व्यग्र असतात. विमानतळावर फिरताना एका गेटवर एकीचे विमान अगदी थोडक्याकरता चुकले, तिने तिथल्या माणसाला खूप विनवले, पण तो म्हणाला, आता विमानाचा विमानतळावरचा संपर्क तुटला आहे. मी काहीही करू शकत नाही.

दुसरीकडे सर्व प्रवासी विमानात बसले होते पण विमानचालक गायब होता, शेवटी माईकवरून त्याचे नाव २-३ वेळा पुकारण्यात आले. इकडेतिकडे फिरल्यावर बरीच भूक लागली म्हणून विमानतळावरच्या उपाहारगृहात शिरलो. तिथे एक मद्रासी दिसला.त्याला पाहिल्यावर असे वाटले की आत्ता इथे गरमगरम इडलीसांबार मिळाले तर किती छान होईल! विमानचालक त्यांच्या गणवेशात बसून त्यांचे जेवण घेत गप्पा मारताना दिसले. फ्राईडराईस खाऊन घेतल्यावर परत एकदा प्राध्यापकांना दूरध्वनी करून आन्सरिंगमशीनवर निरोप ठेवला की 'आम्ही शिकागोवरून निघालो आहोत, दोन तासात पोहोचू' ८ ला निघणारे विमान ९ वाजता गेटवर लागले. विमानात बसल्यावर पण विमान लवकर उडेना. विमानातील छोट्या खिडकीतून बाहेर पाहिले तर एकापाठोपाठ एक अशी विमाने लागली होती. धावपट्टीवरून हळूहळू विमान सरकत होते. विमानांचा वाहतुक मुरंबा झालेला पाहून खूप आश्चर्य वाटले. पाऊस व जोराचा वारा असल्याने विमाने उड्डाणाकरता हळूहळू सोडली जात होती. डेंटनच्या घरातील साफसफाई करण्याने व सामानाची बांधाबांध करण्याने आधीच जीव मेटाकुटीला आला होता, त्यातून हा दीर्घकाळ प्रवास!! पण काय करता ? शेवटी एकदा पंखातील सर्वबळ एकवटून घेतली उडी आकाशात आमच्या विमानाने. थोड्याच वेळात हवाई सुंदरीने शीतपेय आणून दिले, त्यामुळे थोडे बरे वाटले. खिडकीतून खाली पाहिले तर एकदम नयनरम्य दृश्य दृष्टीस पडले. आकाशात जणूकाही पिवळ्या रंगांच्या माळा पसरल्या आहेत. हवामान चांगले नसल्याने विमानाचा वेग कमी होता. रात्री सुमारे १२ ला आम्ही ग्रीनवील साऊथकॅरोलिना विमानतळावर पोहोचलो.सरकत्या जिन्यावरून खाली उतरताच प्राध्यापकांना हस्तांदोलन केले.

आमची छायाचित्रे त्यांना आधीच पाठवल्याने आम्हाला त्यांनी लगेचच ओळखले .तिकडे त्यांचाही थोडा गोंधळ उडाला होता.आन्सरिंगमशीनवर ठेवलेले ४-५ निरोप न ऐकताच ते आम्हाला दुपारी ३ ला ग्रीनवील

विमानतळावर न्यायला आले होते. घरी परत गेल्यावर निरोप ऐकले व रात्री परत १२ ला आम्हाला घ्यायला आले. डेंटन ते ग्रीनवील साधारण १००० मैलाचा प्रवास. तीन तासाची थेट फ्लाईट बुक केली होती. पण या गोंधळामुळे सकाळी ९ वाजता निघून तब्बल १५ तासांनी ग्रीनवीलला पोहोचलो. ग्रीनवील ते क्लेम्सनचा तासाभराचा प्रवास रात्री दिसणाऱ्या घनदाट झाडांनी सुखावून गेला. विनायक प्राध्यापकांशी बोलत होता. मी मात्र डोळे मिटून दिवसभर झालेल्या गोंधळाची उजळणी करत होते. हे आमचे अमेरिकेतील येथे आल्यापासून वर्षाच्या आतले पहिले स्थलांतर . दुसऱ्या स्थलांतरात A TO Z सर्व सामान USPS तर्फे पाठवले. फक्त आमचे पिटुकले दूरदर्शनयंत्र व संगणक आमच्याबरोबर आमच्या कारमधे. अर्थात दूसरे स्थलांतर कारने जाण्याच्या टप्प्यात होते.



# ४) ते तीन महिने !

भारतातून आणलेल्या ४ बॅगा, भारतीय किराणामाल व पुस्तके भरलेली काही खोकी, व अमेरिकेत खरेदी केलेला पहिलावहिला छोटा टीव्ही असा सर्व बाडबिस्तारा घेऊन आम्ही आमच्या अपार्टमेंटमध्ये प्रवेश केला. डेंटन - टेक्सास एक वर्षाचा कालावधी खूप छान गेला होता.साऊथ कॅरोलायना - क्लेम्सनचा निसर्गरम्य परिसर पाहून आपण एका चांगल्या ठिकाणी येऊन पडलो आहोत याचे समाधान होते. या अपार्टमेंटमध्ये आम्ही फक्त ३ महिन्यांकरता आलो होतो. आलो होतो म्हणण्यापेक्षा आम्हाला यावेच लागले होते. ही जागा आम्हाला कशीबशी मिळाली होती.डेंटनवरच्या एका ओळखीच्या मित्राच्या मित्राकडे आम्ही ८ दिवस राहिलो होतो.रोजच्या रोज जागेची विचारणा करताकरता ही एक जागा आम्हाला मिळून गेली आणि तीही ३ महिन्यांकरताच! क्लेम्सनमध्ये विद्यापीठ सोडून बाकी काहीच नाही. तिथली घरे ३ ते ४ बेडरूमची व सर्वच्या सर्व विद्यार्थ्यांनी भरलेली होती. ते उन्हाळ्याचे दिवस होते. ३ ते ४ बेडरूम अपार्टमेंटपैकी आम्हाला एक जागा मिळाली कारण त्या जागेत राहणाऱ्यांचे शिक्षण पूर्ण होऊन ते तिथून जागा सोडून गेले होते. अपार्टमेंट चांगले मोठे व टुमदार होते.१२०० ते १३०० स्क्वेअरफूटचा फ्लॅट होता. हॉलकिचन कॉमन.बाकीचे दोघेजण तिथेच राहत होते पण सुट्टी करता गावी गेले होते. अपार्टमेंट मध्ये सर्व फर्निचर होते. शिवाय एक टीव्ही, वॉशिंगमशीन, डीशवॉशर व मायक्रोवेव्हही होता. आम्हाला आमची ग्रोसरी व काही भारतातून आणलेली भांडीकुंडी ठेवण्याकरता जास्त जागाच नव्हती. थोडीफार जागा त्यातल्यात्यात करून घेतली. भांडी डीशवॉशरमध्ये ठेवली. फ्रीजही बराच भरलेला होता. त्यातला एक कप्पा मी भाजी ठेवण्या करता रिकामा करून घेतला. आमची रूम म्हणजे एक मोठी आयताकृती बेडरूम व त्यात एक कॉट व त्याला लागूनच टबबाथ वगैरे होते. बेडरूममध्येच आमच्या मोठाल्या ४ बॅगा व भारतीय किराणामालाने भरलेली काही खोकी ठेवली.

क्लेम्सनमध्ये सर्व घरे उंचसखल भागात विसावलेली आहेत. सभोवती हिरवीगार झाडे.निसर्गाने नटलेले हे शहर खूपच सुंदर आहे.विनायक सकाळी ८ ला जायचा ते संध्याकाळी ६ ला घरी यायचा. तोपर्यंत मी एकटीच भुतासारखी त्या मोठ्या फ्लॅटमध्ये असायचे. क्वचित कुणीतरी पायी चालत जाताना दिसायचे किंवा एखादी कार जाये करताना दिसायची. उन्हाळ्याच्या सुट्टीत बरेचसे विद्यार्थी गावी गेले होते . या अपार्टमेंट कॉप्लेक्समध्ये एकही भारतीय राहत नव्हता.भारतीय विद्यार्थ्यांची वस्ती दुसरीकडे होती.त्या परिसरला सर्व बाँबे एरिया म्हणत. दिवसभर एकटीला खूपच कंटाळा यायचा. विनायक पोळीभाजीचा डबा घेऊन जात असल्याने पोळीभाजी सकाळीच होऊन जायची. भाजी आदल्या दिवशी चिरून ठेवायचे. नाही म्हणायला तिथे केबल टीव्ही होता व काही इंग्रजी मासिके होती. अमेरिकेत तसे नवीनच होतो. एक वर्ष डेंटनला राहून लगेच क्लेम्सनमध्ये आलो होतो. त्यामुळे कार नाही व संगणकही नाही. उन्हाळ्याची सुट्टी असल्याने तिथल्या बसेस एकेक तासाने धावत असत. त्या अपार्टमेंटपासून विद्यापीठ बऱ्यापैकी लांब होते. चालत पाऊण ते एक तास लागत होता. त्यातूनही चालणे उंचसखल भागातून होते. काहीवेळा भलेमोठे उतार व काहीवेळा भलीमोठी चढण . चालायला आम्हाला दोघांनाही आवडते त्यामुळे रिकाम्या रस्त्यावरून चालताना छान वाटायचे. स्वच्छ सुंदर हवा व उन्हाळ्याची सुरवात नुकतीच झाली होती. वसंतऋतूचा गारवा थोडा शिल्लक होता.

क्लेम्सनला आल्यावर एका भारतीय कुटुंबाकडे आम्ही ८ दिवस राहिलो होतो त्यामुळे ती एक मैत्रिण झाली होती व तिचा मुलगाही खूप छान होता. तिचे नाव सुनिता. तिच्याशी मी सकाळी १ तास व दुपारी १ तास फोन वरून बोलायचे. लँडलाईनवरून लोकल कॉल्सचे वेगळे पैसे पडत नसत. तिलाही बोलायला हवे असायचे कारण की ती पण खूप दूर एका टेकाडावर राहत होती. तीही एकटीच होती. ती म्हणायची बरे झाले

तुम्ही आलात. मला कोणीतरी बोलायला एक मैत्रिण मिळाली. दिवसभर वेळ कसा घालवायचा याचे मी एक रूटीन आखून घेतले होते तरी कंटाळा येतच होता. उघड्या तुरुंगात कुणीतरी डांबून ठेवल्यासारखे वाटायचे. त्या तीन महिन्यात मी भरपूर टीव्ही बघितला अर्थात अमेरिकन इंग्रजी चॅनल्स. एक चॅनल लावायचा,तिथे काही चांगले असेल तर ते बघायचे, नसेल तर दुसऱ्या चॅनलकडे वळायचे .बऱ्याच सिरिअल्स व चित्रपट बघितले . टीव्ही बघायचा कंटाळा आला की तिथे असलेली इंग्रजी मासिके वाचायचे. त्याचा कंटाळा आला की जे काही मनात येईल ते एका डायरीत लिहीत सुटायचे. बाकी कामात तर वेळ जातोच. हॉलचे दार उघडेच ठेवायचे. दारात उभे राहून आजुबाजूला पाहिले तर माणसे सोडा, साधे चिटपाखरू पण दिसायचे नाही. परत आत येऊन बसायचे. बरेच वेळा रंडकुंडीला यायचे. रोज दोनदा विनायकलाही लॅबमध्ये फोन करायचे. त्यावेळी भारतात अगणित कॉल करता येत नव्हते.१० डॉलरला २० मिनिटे कॉलिंग कार्डवर मिळायची. काहीवेळा कॉल मध्येच तुटायचा व त्या पुढील मिनिटे वाया गेलेली असायची.

वाहत्या रस्त्यापासून हे अपार्टमेंट खूपच आत होते. एकदा मुख्यरस्ता कुठे आहे ते बघून आले व अंदाज घेतला की बाहेर एकटे चालत गेलो तर किती चालायला लागेल. बरेच लांब अंतर होते. ठरवले, काहीना काही निमित्ताने बाहेर पडायचेच. नंतर एकदा मुख्य रस्त्याला लागून एकार्ड दुकान व त्याच्या बाजूलाच पोस्ट ऑफीस आहे ते कळाले. मग माझी भारतात पत्रे लिहायला सुरवात झाली. दर आठवड्याला एक पत्र लिहून ते पोस्टात टाकू लागले. शिवाय एकार्डमधून दुधाचे कॅन आणत असे. ते मोठाले व जड कॅन हातात घेऊन उंचसखल भागातून चालताना हात व पाय खूप दुखायचे .पण त्यामुळे वेळ ही जायचा व कामही व्हायचे.उन्हाळा वाढत गेला तसा चालायचा त्रास व्हायला लागला.टोपी आठवणीने घालून जायचे तरी उन्हाने डोके खूप दुखायचे. आमच्याकडे बसचे वेळापत्रक होते

आणि आमच्या अपार्टमेंट जवळच बसस्टॉप होता पण बसचा कधी आवाज आला नाही की की बस स्टॉप कधी दिसला नाही. एखादी तरी बस दिसायला हवी ना! मग स्टॉप कुठे आहे ते शोधून काढता येईल पण बस दिसायचे नावच नाही! आणि एकदा अचानक चालत असताना समोरून बस येताना दिसली .बस बरीचशी रिकामीच होती. मला बस बघून खूप आनंद झाला व ती बस कुठे जाते व कोणत्या रस्त्यावर वळते हे पाहण्याकरता रस्त्यावरच उभी राहिले. दुसऱ्या दिवशी बस जिथे वळाली त्या रस्त्यावरून चालत जाताना बरेच लांब गेल्यावर मला एक बसस्टॉप दिसला. इथे बसस्टॉप पटकन ओळखू येत नाहीत. बसस्टॉपवर बसायला काहीच नसते.एका खांबाला एक पाटी लावलेली दिसली आणि पाटीवर नाव होत Clemson Area Transit. बसस्टॉप माहीती झाल्यावर विनायक विद्यापीठात बसने जायला लागला. मी पण आठवड्यातून एक दिवस विद्यापीठात जाऊन तिथल्या लायब्ररीत जायचे. तिथे नेटवर मेल चेक करायचे व थोडे वाचायचे.दूर टेकाडावर राहणाऱ्या सुनिताकडे आठवड्यातून एक दिवस जायला लागले पण तरीही मैत्रिणीच्या घराच्या तिथे बस जात नव्हतीच. विद्यापीठात बसने जाऊन नंतर एक डोंगर चढून तिच्याकडे जावे लागायचे. शनिवार रविवार आठवड्याची ग्रोसरी आणाताना बसने जात होतो पण तरीही त्रास होतच होता. बसस्टॉप लांब होता त्यामुळे ओझी वाहून नेताना खूप दमायला व्हायचे. उन्हाळा असल्याने दिवस मोठा होता त्यामुळे आम्ही उन्हे उतरल्यावर ग्रोसरीला जायचो. त्यावेळी मी ग्रोसरिला जाताना पंजाबी ड्रेस घालायचे. थोडा वेगळेपणा यायचा.

विद्यापीठातून रोज विनायक संध्याकाळी ६ ला घरी आल्यावर चहाखाणे झाले की लाईफटाईम चॅनलवर आम्ही ओळीने रोज दोन चित्रपट पहायचो. रात्रीची मुगाच्या डाळीची खिचडी किंवा आमटी भात खाऊन मग थोडा वेळ अपार्टमेंटच्या बाहेरच्या बाजुला एक बाकडे होते तिथे

जाऊन बसायचो. रात्री छान थंडगार वाटायचे. क्लेम्सनमध्ये उन्हाळ्यात पुण्यात जसा वळवाचा पाऊस पडतो तसाच पडायचा. काहीवेळा गारा पडलेल्या पाहिल्या आहेत. तेव्हा तर हे शहर पावसाने भिजल्यावर खूप छान दिसायचे .खूप जोराचा पाऊस यायचा. शनिवार रविवार भारतातून आणलेल्या गाण्यांच्या कॅसेट ऐकायचो .आम्हाला कमीतकमी २ वर्षे राहता येईल अशी जागा शोधायची होती. आमच्याकडे असलेल्या अपार्टमेंट गाईडवरून जागा बघण्या करता मी फोन करायचे व तिथे जाऊन अपार्टमेंट पहायचे. एकतर तिथे अपार्टमेंट बघण्यासाठी जास्त वाव नव्हता .दोन बेडरूमचे फ्लॅटही विद्यार्थ्यांनीच घेतले होते. एक दोन जे रिकामे झाले होते ते तिककेसे चांगले नव्हते आणि भाडी पण खूप होती. १ बेडरूम असलेल्या १- २ जागा होत्या त्या खूपच अंधाऱ्या होत्या. आठवड्यातून दोन चकरा तरी अपार्टमेंट पाहण्याकरता मी जात होते. नंतर कळाले की तिथे फक्त एक रुमची पण अपार्टमेंट आहेत. एक विद्यार्थी ओळखीचा झाला होता. तो पिएचडी करत होता. त्याचे लग्न झाले होते. हे असे लग्न झालेले विद्यार्थी अशा एकरूमच्या अपार्टमेंटमध्ये राहत होते.अशा अपार्टमेंटला इथे स्टुडिओ अपार्टमेंट म्हणतात. अशी २ ते ४ जोडपी या क्लेम्सनमध्ये आहेत असे कळाले. आम्ही पण स्टुडिओ अपार्टमेंट पाहायचे ठरवले. त्या ओळख झालेल्या विद्यार्थ्याकडून फोन घेतला व जागा बघण्याकरता आम्ही दोघेही गेलो. अशा जागा काही ठिकाणी होत्या. एक जागा खूप उंचावर असलेल्या एका टेकाडावर होती. जी जागा पाहण्याकरता गेलो होतो ती मुख्य रस्त्याला लागून होती. बसस्टॉप जागेला लागूनच होता. त्या रूममध्ये डीशवॉशर व वॉशिंगमशीन नव्हते. लॉड्रोमेट ( धुणे धुवायचे दूकान ) चालायच्या अंतरावर होते. रूममध्ये टबबाथ होते. सर्व बाजूने विचार करताही जागा आम्हाला सोयीची वाटली. शेवटी विचार करून नाईलाजाने व नाखुषीनेच त्या छोट्या जागेत रहायला गेलो.

स्टुडिओअपार्टमेंट मध्ये राहण्याची आमची पहिलीच वेळ. ४ भिंतींची एकच खोली. त्यातच टबबाथ वगैरे. अर्थात आमच्याकडे फक्त इंडियावरून आणलेल्या चारच बॅगा होत्या. त्यामुळे त्या  एका खोलीत मी जमेल तसा संसार उभा केला होता.



# ५) कॅट बस

आम्ही जेव्हा क्लेम्सन शहरात आलो तेव्हा तिथे आम्हाला भेटली एक बस. ती म्हणजे कॅट बस.कॅट म्हणजे Clemson Area Transit . शेंदरी व जांभळ्या रंगाची रंगसंगती असलेल्या कॅट बसवर मात्र वाघाचे पंजे उमटवलेले होते. दर पंधरा मिनिटांनी ही कॅट धावत असे आणि महत्त्वाचे म्हणजे चकटफू ! विद्यापीठ, घराची प्रत्येक कॉलनी व दोन तीन किराणामालाची दुकाने येथे प्रत्येक ठिकाणी ही बस जात असे. क्लेम्सन हे डोंगराळ अशा उंच सखल भागात वसलेले छोटे शहर. सगळीकडे हिरवीगार घनदाट झाडी. अशा हिरव्यागार पार्श्वभूमीवर ही शेंदरी व जांभळ्या रंगाची रंगसंगती असलेली कॅट खूपच उठून दिसे. काही चिनी व अमेरिकन विद्यार्थी सोडल्यास ही बस भारतीय विद्यार्थ्यांनी सतत भरलेली असे. बसमध्ये प्रवास करताना असे वाटे की आपण मुंबईमधल्या बेस्टमधून तर प्रवास करत नाही ना ! प्रत्येक कॉलनी, विद्यापीठ, किराणामालाची दुकाने याशिवाय पोस्ट ऑफिस , बँक, लाँड्री येथेही एकेक थांबा होता. कॅट बसचे अजून एक वैशिष्ट्य म्हणजे बसथांब्या व्यतिरिक्त एक विनंती थांबाही असे. क्लेम्सन शहरात लेमान्स कॉलनी खूपच मोठी होती आणि या लेमान्समध्ये सर्व भारतीय विद्यार्थी रहात होते. म्हणून या विभागाला Mumbai area म्हणत असत. कॅटच्या सर्व अमेरिकन वाहनचालकांना Mumbai area म्हणून माहित होता.घराच्या खिडकीतून जाता येता डोकावले की कॅट अगदी सहज दिसत असे. अगदी दिसली नाही तरी तिच्या आवाजावरून कळत असे. बसथांब्यावर बस आली की पटापट उड्या मारत सर्व भारतीय विद्यार्थी येत तोपर्यंत थांब्यावर अगदी शुकशुकाट असे. काही वेळेला तर हे भारतीय विद्यार्थी त्या अमेरिकन वाहनचालकाला भजी पकोडे खिलवत असत. शुक्रवार व शनिवार रात्री ८ ते ११ ही बससेवा खास आठवड्याचे किराणामाल, दूध भाजी आणण्याकरता

होती. तेव्हा खूप मजा येत असे. काही ठराविक विद्यार्थी, विद्यार्थ्यांमध्ये लग्न झालेली जोडपी, आमच्यासारखी संशोधन करणारी जोडपी असत. मग अगदी सकाळपासून काय काय आणायचे याची यादी बनवून ठेवायचो आम्ही सर्व बायका. बाय-लो ग्रोसरी स्टोअर्सचे फ्लायर्स पोस्टातून येत असत. त्यामध्ये कोणकोणत्या किराणामालावर सेल आहे ते लिहलेले असायचे. काही वेळेला बाय वन गेट वन असाही सेल असायचा. त्यादिवशी आम्ही बायका भारतीय पेहराव करायचो. ती जणू काही आमची छोटी पिकनिकच असे.रात्रीची  बस म्हणून बसमध्ये मंद प्रकाश व बारीकआवाजात इंग्लिश ट्यून. एकीकडे आमच्या गप्पा. सगळ्या कॉलनीतून प्रत्येकाला घेत घेत ती बस विद्यापीठात जाऊन नंतर ती दुकानात जायची. कारण विद्यापीठात कोणाचे संध्याकाळ व रात्रीचे वर्ग असतील तर त्यांनाही तेथून ग्रोसरी आणायला सोयीचे पडे. बाय- लो ग्रोसरी स्टोअर्सच्या समोर ती बस आम्हाला सोडायची व परत न्यायला यायची अर्ध्या तासाने. या अर्ध्या तासात पटापट सर्व खरेदी करायची म्हणजे आमच्या सर्वांची अगदी धावत पळत खरेदी व्हायची. ग्रोसरीचे सर्व सामान उतरवून कार्ट जागेवर लावेपर्यंत ती बस यायची सुध्दा. प्रत्येकाकडे भरपूर सामान, दूध व ज्यूसचे कॅन, तांदूळाची पोती, तेलाचे कॅन, भाज्या. आयस्क्रीमच्या बादल्या, पेप्सी इ.इ. सर्व असे.त्या संपूर्ण बसमध्ये आम्ही जेमतेम बारा पंधरा जण , पण संपूर्ण बस आमच्या कॅरी बॅग्जने भरून जायची. अशा रितीने कॅट बसच्या मदतीने आमचा ग्रोसरी डे पार पडायचा !! कॅटबसचालक इतके काही ओळखीचे झाले होते की रस्त्यावरून फिरायला म्हणून बाहेर पडलो आणि बस जात असेल तर बसमधून आम्हांला हात दाखवून हाय करायचे  !! आणि हो विसरलेच की या बसमधून विद्यार्थी आठवड्याची लॉंड्री करण्याकरता कपड्यांनी भरलेल्या लॉंड्री बास्केट पण घेऊन यायचे. मी कॅटला खूप मिस करत आहे कारण मला स्वत:ला कार प्रवासापेक्षा बसमधून

किंवा ट्रेनमधून प्रवास करायला खूपच आवडते.

जेव्हा आम्ही क्लेम्सनला आलो तेव्हा सुरवातीला मी वेळ जाण्यासाठी म्हणून या बसमधून खूप हिंडली आहे. एका पर्समध्ये वेळापत्रक घ्यायचे. शिवाय एक पाणी पिण्याची बाटली, कूकीज, टोपी, छत्री घेऊन जायचे. ही बस क्लेम्सन शहराच्या जवळच असलेल्या इतर छोट्या शहरातून पण जात होती, अर्थात इतर शहरातून सोमवार ते शुक्रवार धावत असे. मी व माझी पैत्रिण बरेच वेळा नेहमीच्या ग्रोसरी स्टोअर मध्ये न जाता वेगवेगळ्या ग्रोसरी स्टोअरला जात असू.

याच बसने मी विद्यापिठात जात असे. तिथल्या लायब्ररीत ई-सकाळ वाचून मग कुणाची मेल आली का तेही बघायचे. दुसऱ्या डोंगरावर राहणाऱ्या मैत्रिणीकडे याच बसने आधी विद्यापिठात जायचे. तिथून चालत एका डोंगरावरून चढून मैत्रिणीकडे जायचे, नंतर नोकरी लागल्यावर ही बस मला खूप उपयोगी पडली, नोकरीची जागा चालण्याच्या अंतरावर होती तरी सुध्दा मी या बसने जात असे. अजून एका मैत्रिणीकडेही ही बस दूरवर जायची. खूप उंचावर होते तिचे घर. या बसने भरपूर फिरल्याने सर्व वाहनचालक ओळखीचे झाले होते. मी रस्त्याने चालायचे तेव्हा थांबून विचारायचे 'यायचे आहे का ?' अशी ही बस माझी खूप आवडती होती. आम्ही कार घ्यायच्या आधी विनायक पण लॅब मध्ये बसने जायचा.



# ६) क्लेम्सन युनायटेड मेथॉडिस्ट चर्च

क्लेम्सन युनायटेड मेथॉडिस्ट चर्चमध्ये मला अमेरिकेतली पहिली नोकरी लागली.कामाची वेळ रविवारी सकाळी ८ ते १२ अशी होती. चर्चमध्ये अमेरिकन्स प्रार्थनेसाठी येतात. काही जण त्यांच्या मुलांना घेऊन येतात. त्या मुलांना सांभाळण्यासाठी चर्चमध्ये सोय केलेली असते. इथेच नोकरी करणाऱ्या दोन इराणी बायका होत्या. एक होती फातिमा आणि दूसरीचे नाव निलूफर. फातिमा आम्हाला दोघींना तिच्या कारमधून आमच्या घरातून न्यायला आणि काम झाले की सोडायलाही यायची. काही दिवसांनी त्या दोघी इराणी बायका दुसऱ्या शहरात निघून गेल्या. नंतर मी चर्चमध्ये चालत जायचे. जाताना आणि येताना मिळून माझे चालणे एक तास व्हायचे. सकाळी चालत जाताना रस्त्यावर चिटपाखरुही नसायचे. कडक थंडीच्या दिवसात मायनस सेल्सिअस तापमानात जाताना फ्रेश वाटायचे. सूर्याची कोवळी किरणे अंगावर पडायची तर ढगाळी हवामानात अजून थोडी जास्तच थंडी वाजायची. कार घेतल्यावर सकाळी मी चालत जायचे. काम झाल्यावार विनायक मला कारने न्यायला यायचा. ही नोकरी खूप छान होती. कधी कधी १/२ मुलेच सांभाळायला असायची तर कधी कधी १०/१२ यायची. दोन खोल्यांमधून ही मुले सांभाळायला असायची.

चर्चची मुख्यपदावर असलेली बाई अधून मधून चक्कर मारायची आणि सर्व व्यवस्थीत आहे ना ? असे विचारायची. मुलांबरोबर आम्ही बायका पण तिथे ठेवलेल्या कुकीज आणि केक खायचो. मुलांबरोबर आम्ही पण त्यांच्यात सामील होऊन खेळायचो. हे डे केअर नव्हे. मुलांना सांभाळायची चर्चने केलेली एक सोय असते. नंतर बुधवारी संध्याकाळी प्रार्थना सुरु झाली अणि मी बुधवारी संध्याकाळी ६ ते ८ जायला लागले.बुधवारी बससेवा असल्याने मी बसने जा-ये करायचे. रविवारी सकाळी ८-१२ मध्ये थोडा थोडा वेळ मुले यायची . काही जण ठराविक

अंतराने जायचे. काम काहीच नाही. मुलांना काही खायला द्यायचे असेल तर त्यांचे पालक आमच्याकडे त्यांच्या खाण्यापिण्याच्या पिशव्या देऊन जायचे माझ्याबरोबर काही इराणी व युरोपियन बायका होत्या.

डेंटनला रहात असताना माझ्या जे २ विसावर वर्क परमिट काढले आणि त्याचा पुरेपूर फायदा झाला. एका चर्चमध्ये एक बाई इंग्रजीचे क्लास घ्यायची. हा क्लास दर मंगळवारी सकाळी ८ते १० असायचा. क्लासमध्ये शिकायला येणाऱ्या बायका चिनी, जपानी, कोरिअन, टर्किश, पाकिस्तानी अशा इतर देशातल्या होत्या. क्लास होईपर्यंत तिथे शिकायला येणाऱ्या बायकांची मुले मी व माझी मैत्रिण रेणुका सांभाळायचो. ही नोकरी मला जास्त दिवस करता आली नाही कारण त्याच चर्चमध्ये एक डे केअर होते. तिथे मला सोमवार ते शुक्रवार दुपारच्या वेळात ११ ते ४ अशी नोकरी मिळाली. टोडलर ग्रुपमध्ये. मेथॉडिस्ट चर्चमध्ये बुधवारी संध्याकाळी प्रार्थना सुरु झाल्यावर संध्याकाळी जायचे. बुधवारी कामावर गेल्यावर ४ लाच घरी यायचे व स्वयंपाक करुन परत ६ ते ८ जायचे. मला फक्त शनिवार एकच दिवस मिळायचा. बाकीची इतर कामे करायला मी खूपच बिझी झाले होते! लहान मुलांच्या सहवासात राहून आनंद वाटत होता. नोकरी व घरचे सर्व करुन खूप चपळही बनले होते. माझी नोकरी पॉकेट मनी पुरतीच. सॅलरी चेक बँकेत टाकायला छान वाटायचे. स्वत:च्या कमाईचा एक आत्मविश्वास वाटायचा !

--------✻--------

# ७) इंग्रजीचा वर्ग

मेथॉडीस्ट चर्चमध्ये कॅथेलीन नावाची ७० वर्षाची बाई इंग्रजीचा वर्ग घ्यायची. हसतखेळत वर्ग चालायचा हा. या इंग्रजी वर्गाची सर्वात प्रमुख बाई बॉबी ८५ वर्षाची होती. या इंग्रजी शिकणाऱ्या वर्गामध्ये प्रामुख्याने चिनी, जपानी, कोरीअन, टर्कीश, पाकिस्तानी या देशातील विद्यार्थ्यांच्या बायका होत्या. या बायका त्यांच्या मुलांनापण घेऊन यायच्या. या चर्चमध्ये त्या बायकांना इंग्रजी नीट शिकता यावे या करता तात्पुरती मुलांना सांभाळण्यासाठी सोय केलेली असते .मी व माझी एक श्रीलंकन मैत्रीण रेणूका या मुलांचे बेबीसिटींग करायचो.मुले एक/दोनच असायची.ही मुले आमच्याकडे राहायची नाहीत. आम्हाला खूप वैताग यायचा, एकतर त्या मुलांना इंग्रजी बोललेले कळायचे नाही आणि खूप रडायची.त्यांना आई दिसायची नाही व खूप कावरीबावरी व्हायची. अशा वेळी मग त्या बायका मुलांना घेऊनच इंग्रजी वर्गात बसायच्या, मग आम्ही पण त्या वर्गात उपस्थित राहायचो, मजा म्हणून !

हा इंग्रजीचा वर्ग असायचा आठवड्यातून एक दिवस दोन तास. एके दिवशी एक धडा. त्या धड्यातील सर्व वाक्ये एकेकीने वाचायची. प्रत्येकीचे उच्चार वेगळे. या सर्व बायका इंग्रजी वाक्यांच्या खाली त्यांच्या भाषेतून इंग्रजी उच्चार लिहून घ्यायच्या. जसे मराठीतून ('माय नेम इज' याप्रमाणे) इंग्रजी शिकवताना शिकवणे कमी व गप्पा जास्ती. कॅथेलीन तिच्या नातवंडांची, पतवंडांची छायाचित्रे दाखवायची. प्रत्येक विद्यार्थिनीची चौकशी करायची. इंग्रजी शिकवताना इकडच्या तिकडच्या गप्पांमध्ये एकदा साडीचा विषय निघाला. प्रत्येकीने साडीबद्दल खूप उत्सुकता दाखवली व मला विचारले की 'तू आम्हाला साडी कशी नेसायची हे शिकवशील का?' कॅथेलीनच्या वर्गात ७-८ विद्यार्थिनी होत्या. प्रत्येकीलाच उत्सुकता आहे

म्हणल्यावर एके दिवशी ‘साडी नेसण्याचा दिवस‘ घोषित केला. एका चीनी बाईकडे तिने भारतातून आणलेल्या ३-४ साड्या होत्या, त्याप्रमाणेच मॅचिंग पेटीकोट व ब्लाऊज पण होते. २ चिनी मुलींना साड्या नेसवल्या. नंतर लगेच साडी मधले छायाचित्रण ही झाले. एका कोरिअनबाईला शर्टपॅन्टवर च साडी नेसवली.

त्यातील पाकिस्तानी बाईने माझ्याकडून ३-४ साड्या सेट करुन घेतल्या. (सेट करून घेतल्या म्हणजे लहानमुलींची ‘कल्पना‘ साडी असायची त्याप्रमाणे). सेट केल्या म्हणजे निऱ्यांना व पदराला पिना लावलेल्या तिने तशाच ठेवल्या. साडी नेसणे शिकवल्याबद्दल या सर्व बायकांनी मिळून माझे आभार मानले. साडीबद्दल इतकी उत्सुकता दाखवल्याबद्दल मला तर खूपच छान वाटत होते. एकदा कॅथेलीनने आम्हाला तिच्या घरी ख्रिसमसपार्टीला बोलावले .तिथे ८५ वर्षाची ‘बॉबी‘ व तिची १०२ वर्षाची आई ‘जुली‘ पण आली होती. ख्रिसमसचे झाड सुंदर सजवले होते व त्या झाडाखाली आम्हाला द्यायच्या भेटवस्तू ठेवल्या होत्या. रंगीबेरंगी व आकर्षक कागदी पिशव्यांमध्ये भेट्वस्तू व त्या पिशव्यांमध्ये एकेकीच्या नावाची चिठ्ठी. प्रत्येकीला वाटले की आपल्याला काहीतरी वेगळी भेटवस्त ूआहे, पण सगळ्यांच्या भेटवस्तू एकसारख्याच होत्या. नंतर सगळे मिळून स्मरणशक्तीचा खेळ खेळलो . स्मरणशक्तीच्या खेळात तिच्या घरांतील फक्त वस्तूंची नावे घ्यायची होती. जेवणामध्ये सलाड, सँडविच, चॉकलेटकेक, ज्युसेस, सुकामेवा, बटाटाचिप्स, आल्याचीवडी (भारतीय नाही), कुकीज असे होते. आम्ही पण सर्वांनी कॅथेलीनला भेटवस्तू दिल्या. कॅथेलीनने प्रत्येकीच्या नवऱ्याला जेवण बांधून दिले. ‘ख्रिसमस सुखाचा जावो’ अशा शुभेच्छा देऊन एकमेकींचा निरोप घेतला. पार्टी सकाळी ११ लाच होती. त्यादिवशी मायनस ५ अंश सेल्सिअस तापमान व कोणत्याही क्षणी पाऊस कोसळेल असे काळेकुट्ट आकाश भरून आले होते. असे पावसाळी वातावरण मला खूपच आवडते त्यामुळे ही पार्टी माझ्या कायम लक्षात राहिली.

# ८) अमेरिकेतील पाळणाघर

मला एका डेकेअरमध्ये substitute babysitter चा अनुभव मिळाला, त्यातिल काही मुलांच्या आठवणी आहेत. मी टोडलर (Toddler) वर्गामध्ये काम केले. टोडलर मधली दिड ते अडीच वयो गटातील व एक नंबरची खट्याळ असतात. एकमेकांना चावतात, चिमटे काढतात, ढकलतात. त्यातील काहीजण एकमेकांचे जिगरी दोस्त पण असतात. तिथे एकूण १० मुले होती ,त्यातिल २ मेक्सिकन आणि ८ अमेरीकन होती..

टोडलर मधील मुले मला 'हिनी' हाक मारत. त्यांना रोचा उच्चार येत नसे.वर्गावर गेल्यावर 'हायहिनी' आणि निघताना 'बायहिनी' असे म्हणत. याडे-केअर मध्ये सकाळी ७ वाजल्यापासून ते संध्याकाळी ६ वाजेपर्यंत मुले राहतात. यावेळा मध्ये त्या मुलांचे रुटीन आखलेले असते. त्यात न्याहरी, जेवण, झोप, मैदानावर जाउन खेळणे, त्यांना गोष्टीची पुस्तके वाचून दाखवणे, कविता म्हणून दाखवणे, रंग ओळखायला सांगणे, खडूने रंगवायला सांगणे इ. इ.असते. दुपारी साधारण २ तास मुलांनी झोपावे असे अपेक्षित असते. त्यांच्या छोट्या गाद्यांवर प्रत्येकाची नावे लिहिलेली असतात. त्या गाद्या आणि छोटी पांघरुणे वर्गामध्ये घालायची, व एकेकाला झोपवायचे. काहींना झोपताना कापडी वाघ बरोबर लागतो, कोणाला कासव, तर कोणाला बदक तर कोणाला बाहूली. मुलांना झोपवताना त्या खोलीमध्ये अंधार करायचा, व बालगीतांची सीडी कमी आवाजात लावायची.

मॅनव्हेल हा माझा सर्वात आवडता मुलगा. गोरापान, चिक्कूच्या आतिल बियांसारखे काळेभोर डोळे, नकटे नाक, तपकिरी केस, लालचुटूक ओठ व टम्मपुरीसारखे गाल. खूपच गोड होता. तो मला 'फोइनी' म्हणायचा.जेवणानंतर झोपायच्या वेळेस लवकर झोपायचाच नाही, सगळी बालगीते संपायची, सर्व मुले झोपायची, तरी हा आपला 'टक्क'

डोळे ठेवून जागाच! त्याच्याकडून मी रोज काही मराठी वाक्ये वदवून घ्यायचे, ती वाक्ये अशी ‘ मी मुलगा आहे ‘, ‘माझे नाव मॅनव्हेल आहे‘, ‘मला रोहिणी आवडते‘, मराठी उच्चार स्पष्टपणे करायचा. त्याचे मराठी स्पष्ट उच्चार ऐकून मी खूप हसायचे, मग तोही हसायचा, आम्ही दोघे मिळून खूप जोरजोरात हसायचो. ॲनाला माझे नेकलेस सारखे दिसणारे काळ्या मण्यांचे मंगळसूत्र खूप आवडायचे. मला म्हणायची, ‘ तुझा नेकलेस छान आहे, मला दे.‘ एकदा तर हटूनच बसली, म्हणाली ‘मला तुझा नेकलेस घाल‘, आता तिला कसे सांगणार की हा नेकलेस लग्न झाल्यावरच घालायचा असतो. मग तिला सांगितले ‘ माझ्या गळ्यातून हा नेकलेस निघतच नाहीये, खूप घट्ट बसलाय. ‘ वील एकदा झोपेतून उठून म्हणाला "my juice" मला त्याचा उच्चार माचिस असा ऐकू आला, मनात म्हणले याला कशाला माचिस पाहिजे ? त्याने फ्रीजकडे बोट दाखवले, तेव्हा मला कळाले त्याला त्याचे ज्युस पाहिजे आहे. इसाबेला हिला झोपताना नेहमी बाहूली जवळ लागायची.त्या बाहूलीचा फ्रॉक, तिचे वेगळे बूट, रंगीबेरंगी दुपटे असा सगळा जामानिमा करून ती तिला जवळ घेउन झोपायची. ती बाहुलीशी खेळताना मला म्हणायची की ‘तू माझी मुलगी, बाहूली तिची दुसरी मुलगी‘ ‘मी बाहूलीला डॉक्टरांकडे घेउन जाणार आहे‘ ‘मी येतेच तोपर्यंत तु येथे थांब‘, मग मी पण तिला म्हणायचे ‘आई तु लवकर ये. तू आली नाहीस तर मी रडेन‘ टोडलर मधील मुले जेवतात ती त्यांच्या हातानेच, येथे भरवण्याची पध्दत नाही.काही मुले त्यांच्या डब्यातील जेवण संपवतात, तर काही खूपच रेंगाळत खातात तर काही जणांचे जेवण बरेचसे खाली सांडते. मी तेथील मुलांना जास्तीत जास्त जेवण भरवायचे, आणि भरवल्यावर ती चांगली जेवायची. प्रत्येकाला जेवण गरम करून देतात. जेवायच्या आधी जीझसचे आभार मानतात, हात जोडून व डोळे मिटून. काहींना इतकी झोप आलेली असते की ते जेवता जेवताच झोपतात. काहीजण एकमेकांना घास भरवतात, तर काही जण स्वतःचे जेवण संपवून दुसऱ्यांच्या डब्यात डोकावतात. येथील अमेरीकन babysitters

५० ते ६५ वयोगटातील जास्त प्रमाणात असतात. तरुण अमेरीकन मुलीही नोकरी करतात ते फक्त त्यांच्या शिक्षणासाठी पैसे उभारण्यासाठी किंवा काहीजणी दुसरी चांगली नोकरी मिळेपर्यंत ही नोकरी करतात. त्यामुळे येथील डेकेअर मध्ये सतत babysitters चा तुटवडा असतो. प्रत्येक आठवड्याचे वेळापत्रक बनते, त्या वेळापत्रकात वर्गाचे नाव, babysitter चे नाव व प्रत्येकीचे वेगवेगळे टायमिंग. येथे प्रत्येक मुलाची accident file बनवलेली असते, म्हणजे समजा कुणी कुणाला चावले, पडले, खरचटले, ताप आला तर त्या प्रत्येक घटनेची नोंद ठेवून त्यावर काय उपाय केले गेले हे पण लिहिले जाते, त्यानुसार मुलाच्या पालकांना सर्व सांगितले जाते. प्रत्येक मुलाचे रोजच्या रोज एक असे कागदी कार्ड बनवले जाते, त्यामध्ये तो जेवला का नाही, किती जेवला, किती वेळ झोपला, खेळताना मूड कसा होता हे सर्व लिहिले जाते. येथे मुलांची दर महिन्याला भरपूर छायाचित्र काढली जातात प्रत्येक स्थितीमधले . झोपताना, जेवताना, खेळताना वगैरे, ते फलकावर लावतात. प्रत्येक मुलाचे त्याच्या आईवडिलां समवेत असलेले छायाचित्र त्या मुलांच्या उंचीच्या त्यांना सहज दिसतील अशा कपाटावर चिकवटतात. दिवसभरात त्यांना आईवडिलांची आठवण आली की ते त्यांचे छायाचित्र बघतात. आईवडील न्यायला आले त्यांच्या मुलांना की लगेच धावत जाउन त्यांना मिठी मारतात. घरी जायला निघालेली मुले त्यांच्या मित्रांना व babystitters ना मिठी मारून व त्यांचे पापे घेउन म्हणतात see you tomorrow.अमेरिकेतील पाळणाघरे छान सजवलेली असतात. भरपूर सर्व प्रकारची खेळणी असतात. येथील स्वच्छता व मुलांची निगा चांगली राखली जाते.येथील babysitters ना खूप कामे असतात. दर तीन तासांनी मुलांचे डायपर बदलणे, जेवायची टेबल-खुर्ची ओल्या फडक्याने पुसून घेणे, व्हॅक्युम करणे. दर आठवड्याला मुलांच्या झोपायच्या गादीचे व उशीचे कव्हर धुणे.सर्व पाळणे ओल्या फडक्यांनी पुसून काढणे, शिवाय प्रत्येक खेळणे ओल्या फडक्याने पुसून काढणे,

कचरा टाकणे जेवणाच्या वेळी  अन्न गरम करून देणे, इत्यादी सर्व कामे.

सर्व प्रकारची औषधे येथे उपचारासाठी ठेवलेली असतात. येथे वरचेवर मुलांचे पालक, babysitters व पाळणाघर चालिका यांची मीटिंग भरवली जाते. पाळणाघर चालवणारी बाई स्वतः दिवसातून तीन-चार वेळेला प्रत्येक वर्गात निरीक्षणासाठी जाते. रोजच्या रोज पालक मुलांना आणण्यासाठी जेंव्हा पाळणाघरात येतात तेंव्हा मूल ताब्यात घेतल्याची सही करायला लागते.सकाळी ७  वाजल्यापासून संध्याकाळी ६ वाजेपर्यंत ही मुले पाळणाघरात असतात. प्रत्येक वर्गात ८-१० मुले असतात. अमेरिकन कायद्याप्रमाणे ३ मुलामध्ये १ babysitter असणे जरूरीचे आहे. प्रत्येक वर्गात एक कायम व तिच्या मदतीसाठी १-२ अशा आळीपाळीने babysitter  नेमाव्या लागतात. पाळणाघर चालिकेला हे खूप अवघड काम असते.प्रत्येक आठवड्यात प्रत्येक वर्गाचे वेगळे वेळापत्रक बनवावे लागते.येथे   babysitters व पाळणाघर चालिका यांना substitute babysitters, substitute directors नेमलेल्या  असतात.अमेरिकन व्यतिरिक्त babyasitters ना (इंडीयन, मेक्सीकन, चीनी वगैरे) work permit असल्याशिवाय पाळणाघरात काम करण्याची परवानगी दिली जात नाही. अपवाद  green card holder.

माझी कामावर जाण्याची वेळ ११ ते ४ होती. लंचटाईम म्हणजे साधारण ११ ते२ हा काळ खूप महत्त्वाचा असे. जेवायला बसायच्या आधी या सर्व मुलांचे हात धुवून पुसून तोंडावरून पाण्याचा हात फिरवून व पुसून त्यांना टेबल खुर्चीवर बसवणे हे माझे काम असे.मला हे काम खूप आवडायचे. १० मुलांमध्ये त्यावेळेला आमच्या तिघींचा वेळ खूप व्यग्र जात असे. एकजण सर्वांचे डब्यातले अन्न गरम करून द्यायची. एकजण मुलांवर लक्ष ठेवायला कारण की ही मुले एका जागी थोडी  बसातात! टेबलखुर्ची पुसण्याचे काम एकजण करायची . या मुलांचे चिमुकले हात धुताना खूप छान वाटायचे मला. डॅनिअल योगर्ट खायचा. मी त्याला

चमच्याने योगर्ट भरवायचे. मग पटापट खायचा. खरेतर या मुलांनी स्वःत हातानेच खाणे अपेक्षित असते. त्यांना भरवायचे नसते. हा डॅनिअल  एक चमचा योगर्ट खाल्यावर इकडेतिकडे पाहत बसायचा. मग ठरवले याला भरवायचेच.  मग कसा पटापट संपवायचा सगळे योगर्ट! हा डॅनिअल मला खूप आवडायचा. सर्व बाजूने वाटोळा होता. जेवणानंतर परत सगळ्या मुलांचे हात धुवून पुसायचे. टेबलखुर्ची पुसायची. मॉपिंग  करायचे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे सर्व मुलांचे डायपर्स बदलायचे.

मला  मुलांना जेवण भरवायला व झोपवायला खूप आवडते. तिथल्या अमेरिकन बायका होत्या त्या मला म्हणायच्या तुझ्याकडे कशी काय पटकन झोपतात मुले ? त्यांनी माझ्यावर मुलांना झोपवण्याचे काम टाकले. मला तेच हवे होते. एकजण सर्व साफसफाईची कामे करायची आणि एकजण सर्व मुलांच डायपर्स बदलण्याचे काम करायची. मी सगळ्या मुलांच्या छोट्या गाद्या घालून प्रत्येकाला झोपवायचे. सर्व लाईट ऑफ व्हायचे. बारीक आवाजात बालगीत वाजवली जायची. मुलांच्या जेवणाच्या आधी मी जेवून घ्यायचे, कारण की माझे जेवण पोळीभाजीचे त्यामुळे माझे जेवण १५ मिनिटात व्हायचे. मला मुलांना झोपवण्याचे काम देवून इतर दोघी लंचला बाहेर जायच्या.अर्थात दोघी एकदम जायच्या नाहीत. या अमेरिकन बायका चांगला १ तासाचा आरामात लंचटाईम घेतात. त्यांचे लंच बाहेर उपाहारगृहातच असते.

डॅनिअलची झोप कावळ्याची! सर्व मुलांना झोपवून आपण खुर्चीवर निवांतपणे बसावे तर हा जागा व्हायचा. सर्वात प्रथम डॅनिअल झोपायचा आणि सर्वात शेवटी मॅनव्हेल झोपायचा. खुर्चीत मी बसलेली असायचे आणि डॅनिअल झोपेतून उठून मान वरू करून माझ्याकडे पाहत बसायचा. त्याला हातानेच 'झोप' अशी खूण करायचे पण काहीही उपयोग नाही. डॅनिअल उठून त्याचे बूट घेऊन माझ्याकडे यायचा आणि दरवाजाकडे बोट दाखवायचा. मग त्याला मी विचारायचे 'want to go outside' की

लगेच मान डोलवायचा. मी व डॅनिअल बाहेरच्या हॉलमध्ये चालायचो. डॅनिअल माझे बोट धरून चालायचा. क्रीपर वर्गामधून क्ले नावाचा मुलगा टोडलर मध्ये नुकताच मुव्ह झाला होता. तो सुरवातीला इतका काही रडायचा की त्याचा चेहरा लालेलाल व्हायचा. मी त्याच्याकडे पाहून हासले की अजूनच जोरजोरात रडायचा. मग मी त्याच्याकडे न हासता पाहू लागले, तरीही त्याचे रडणे थांबेना. मी त्याच्याकडे पाहण्याचे पूर्णपणे टाळले, तरीसुद्धा हळूच एक नजर त्याच्यावरून फिरवायचे व बाजूला तोंड करून हासायचे. हळूहळू त्याचे रडणे थांबायचे पण अगदी थोडावेळ. नंतर मी त्याच्या जवळ असलेल्या मुलाकडे बघून हासायचे बोलायचे. नंतर मग हळूहळू त्याला कळाले की ही बाई आता आपल्याकडे बघत नाही. दुसऱ्यातिसऱ्या दिवशी मी त्याच्याकडे पूर्ण दुर्लक्ष करत आहे हे कळाल्यावर एकदा माझ्यासमोर येऊन उभा राहिला आणि हासला. मग मीही त्याच्याकडे पाहून हासत राहिले. त्यानंतर मग एकदम माझ्याशी गट्टी जमली.

मुले झोपून उठली की त्यांना खायला देतात व मैदानावर खेळायला नेतात. तिथून आल्यावर गोष्टी, गाणी, कवायती, खेळणे, थोडी दंगामस्ती चालू राहते. एलिझाबेथ गाण्याच्या तालावर त्यांना हात वरखाली करायला सांगायची. एलिझाबेथ आणि अँजला या दोघींमध्ये खूप फरक होता. एलिझाबेथ मुलांमध्ये खेळायची व कामे टाळायची. या विरुद्ध दुसरी. ती साफसफाई अगदी मनापासून करायची. एकदा मुलांच्या कवायती मध्ये मी पण सामील झाले तेव्हा एलिझाबेथ रजेवर होती. त्यांना गाण्याबरोबर हातवर खाली करणे. गुडघ्यावर हात ठेवणे असे प्रकार सांगितल्यावर मी एकदम सूर्यनमस्कार घालायला सुरवात केली.आणि मुलांना सूर्यनमस्काराच्या स्टेप्स सांगितल्या. हातवर, हातखाली, एकपायमागे, दुसराही मागे, आता डोके जमिनीवर टेका. याप्रमाणे मी पण एकीकडे सूर्यनमस्कार घालत होते.मजा म्हणजे मुले त्या सर्व स्टेप्स करत होती. मला ते बघून खूपच

हासू येत होते. नंतर मुलेही हासायला लागली. सूर्य नमस्कार घालताना माझ्याकडे पाहून हासत होती. त्यांना मजा याची वाटत होती की बाई कोणते कवायतीचे प्रकार करत आहे याची ! मग एकदा मी मुलांशी खेळताना त्यांच्यात झोपले. डोळे मिटले आणि किलकिले केले आणि मुले हासायला लागली. नंतर डोळे बराच वेळ मिटून घेतले आणि मग एकेक करत मुले येवून माझी डोळ्याची पापणी वर करायची. मी डोळे उघडले की जोरात हासायची. एकदा बसून डोळ्यावर हात ठेवले आणि मुलांना सांगितले कोण बरे पहिले येत आहे माझ्याकडे? मग मुले येऊन डोळ्यावरचा हात काढण्याचा प्रयत्न करायची. मी मुद्दामून मग डोळ्यावरचा हात घट्ट करायचे.खूप दंगामस्ती करायची ही मुले ! एकाला एक खेळ हवा असला की तोच सर्वांना हवा असायचा.

माझे वर्क परमिट संपल्यानंतर ही मी हौस म्हणून जायचे आठवड्यातून एकदोन वेळा. तेव्हा तर तिथल्या बायकांना खूप आनंद व्हायचा.दरवेळी मी निघाल्यावर माझे अनेक वेळा आभार मानायच्या. मी जेव्हा हौस म्हणून जायचे तेव्हा ११ ते २ जायचे पण काही वेळा अचानक कोणी रजेवर गेले तर तिथली डायरेक्टर मला सकाळी ७ ला च फोन करून यायला सांगायची तेव्हा मी सर्व आवरून ८ ला हजर व्हायचे. जेव्हा कामाकरता मला बोलावणे यायचे तेव्हा ती डायरेक्टर मला कामाचे कॅश पैसे द्यायची. खूप छान अनुभव मिळाला मला या नोकरीचा!



# ९) मॉप्स

**MOPS means Mothers Oriented Preschoolers.**

मॉप्स दर महिन्याच्या दुसऱ्या गुरूवारी भरतात. त्या करता एक चर्चमध्ये जागा घेतली जाते. त्याची जाहिरात डेकेअरच्या दरवाज्या जवळ आधी लावली जाते. इथे मला काम करण्याची संधी मिळाली त्याचा एक छोटा अनुभव मी इथे देत आहे.

तर या मॉप्समध्ये आया त्यांच्या मुलांना घेऊन येतात व त्या मिटींगमध्ये सहभागी होतात तर काहीजणी कामानिमित्ताने बाहेर जातात. त्या दोन तासांच्या मिटींग करता त्यांच्या मुलांना सांभाळण्याची सोय केली जाते. हे मॉप्स म्हणजे एक प्रकारची जत्राचअसते; आणि त्या करता जी संचालिका असते तिला सर्वात महत्त्वाचे काम म्हणजे बेबीसीटर्स मिळवणे. या बेबीसीटर्स कॉलेज तरूणीं पासून ते अगदी आजी आजोबांपर्यंत असतात. मुलांच्या प्रत्येक वयोगटा प्रमाणे प्रत्येक खोल्यातून मुले असतात. एकामध्ये १०-१२ मुले. त्यांच्यावर लक्ष ठेवायला २ बेबीसीटर्स व त्या दोन बेबीसीटर्सना मदतीसाठी एक बाई की जी त्या वर्गाची पूर्णपणे जबाबदारी घेणारी. तर या मॉप्सची वेळ असते सकाळी ९ ते ११. भल्यामोठ्या बास्केटमध्ये बरीच खेळणी असतात. त्यातील आपल्याला हवी ती खेळणी त्या वर्गाकरता घेऊन जायची. वर्गामधे लहान मुलांच्या DVD असतात. त्या एकीकडे चालू करायच्या. बेबीसीटर्सना कॉफी केक, चॉकलेट ठेवलेले असतात. दरवाज्याच्या आतील बाजूस त्या मुलांकरता एक कार्यक्रम लिहिलेला असतो. ९ ते ९.३० DVD बघणे, ९.३० ते १० मुलांना मैदानावर खेळायला घेऊन जाणे. १० ते १०.३० मुलांची न्याहरी, १०.३० ते ११ त्यांच्याकडून हस्तकला करवून घ्यायची. त्या मुलांकरता न्याहरीसाठी टेबलवर ऍपलज्यूस, गोल्डफिश, चिमुकल्या कागदी डीश व चिमुकले

कागदी ग्लास असतात. ज्या वर्गावर जी मुले येतील त्यांच्या शर्टाच्या मागच्या बाजूस एका स्टीकरवर त्याचे नाव लिहून तो चिकटवायचा. त्याचे चिमुकले दप्तर घ्यायचे व ते टेबलावर ठेवायचे. त्या चिमुकल्या दप्तरावर पण स्टीकर चिकटवून त्यावर त्याचे नाव लिहायचे. हे सर्व त्या वर्गावरची प्रमुखबाई असते ती करते.आणि त्या वर्गाचे नंतर दार लावले जाते, म्हणजे मग घाला काय गोंधळ घालायचा तो.

तर अशा या मॉप्सला आम्ही तिघी जायचो. मी, रेणुका व प्राची. महिन्याचा पहिला गुरवार गेला की मॉप्सची संचालिका आम्हाला दूरध्वनी करायची, तुम्ही येत्या गुरूवारी मोकळ्या आहात का? मॉप्सला याल का? मी मनातल्या मनात ‘ होहो. तु कधीही बोलाव आम्हाला. आम्ही इथे रिकामटेकड्याच बसल्या आहोत.‘ आम्ही तिला ‘हो, येऊना!अगदी नक्की येऊ मॉप्सला आम्हाला पण खूप आवडते‘ असे सांगितल्यावर मग तिही बरेच वेळा आमचे आभार मानायची. मग आमच्या तिघींचे  एकमेकींना दूरध्वनी, ‘काय गं तुला आले का गं मॉप्सचे बोलावणे?‘ वर्ग सुरू झाला की एक विडिओ कॅसेट लावायची. मग ज्या मुलांना खरोखर कॅसेट पाहण्यात स्वारस्य आहे ती आमच्या मांडीवर येऊन बसायची. काही उभे राहून पहायचे तर काहींना बसायला खुर्ची लागायची. अधुनमधून मग त्या मुख्यबाईची वर्गावर चक्कर ‘सर्व काही व्यवस्थित चालले आहे ना!!‘ मग अर्ध्या तासाने मैदानावर घेऊन जायचे. त्यातील काहींना जायचे नसायचे, तर काही इतके उत्साही की आमच्या पुढेही जायला तयार. कितीही कडाक्याची थंडी असली तरीही मुलांना खाली मैदानावर घेऊन जायचे. त्या १०-१२ मुलांना (वय  वर्षे २-३) खाली न्यायचे म्हणजे आमची कसरत. सगळ्यांना साखळी पद्धतीने हातात हात धरायला सांगायचे. मग एक सर्वात पुढे व एक सर्वात मागे. आमची वरात वरच्या मजल्यावरून खालच्या मजल्याकडे मैदानावर जायला. त्यातून मग ती साखळी  तुटायची. खाली उतरताना काहीजण रूसून जिन्यातच बसायचे, कारण  त्यांना जायचेच

नसायचे. असा तो अर्ध्या तासाचा कार्यक्रम पार पाडायचा.

नंतर न्याहरी. न्याहरीमध्ये मुलांना खुर्चीवर बसवायचे. चिमुकल्या डीशमध्ये गोल्डफिश व ग्लासमध्ये ऍपल ज्युस ठरलेले. एकावेळी २-३ च गोल्डफिश, ते संपले की परत २-३ ,जसे आपण चिमण्यांना दाणे टाकतोना! अगदी तसेच. मग ते गोल्डफिश खाता खाता अर्धा तुटून खाली पडला की ही मुले लगेच खुर्चीच्या खाली उतरून तो चिमुकला तुकडा वेचून खाणार. खाली पडलेले अजिबात खायचे नाही असे बजाऊन सांगत असताना सुद्धा ती मुले तेच करणार आणि मग त्यांना ओरडले की निर्विकार चेहरा करून बघणार. ही सर्व खाण्याची आवराआवरी संपली की मग हस्तकला. यात चित्रे रंगवणे, वेगवेगळ्या आकाराचे स्टीकर्स चिकटवायला देणे. यात काही मुलांना खूप स्वारस्य असते, अगदी आपणहून मागून घेऊन स्टीकर्स चिकटवणार. मग आपण त्यांचे कौतुक केले की एकदम खुश! बाकीच्या मुलांची हस्तकला आपणच करायची आणि कौतुक करायचे वा! किती छान केले आहे. असा हा दोन तासांचा वेळ खूप छान जायचा. मुलेही खुश आम्ही ही खुश! त्या मुलांचे पालक न्यायला आले की मुले अगदी आनंदात त्यांनी केलेली हस्तकला दाखवायचे. सरतेशेवटी निघताना खेळायला घेतलेली सर्व खेळणी त्या भल्या मोठ्या बास्केटमध्ये ठेवायची . तिथे आमच्या करता ठेवलेले चॉकलेट, कूकीज, कॉफी घेऊन आम्ही पण निघण्याच्या तयारीत, दोन तासांचे कॅश पैसे घेऊन शॉपिंगला.

--------✻--------

# १०) केट व मॅगी

एक दिवस माझी मैत्रिण रेणुका हिचा  मला दूरध्वनी आला व तिने मला विचारले ‘ तू माझ्या करता पर्यायी बेबीसीटरचे काम करशील का चार दिवसांकरता?‘ माझा होकार कळताच तिला खूप आनंद झाला व तिने माझे अनेक आभार मानले.

एलिझाबेथ नावाच्या एका अमेरिकन बाईच्या घरी माझी मैत्रीण तिच्या ६ महिन्यांच्या जुळ्या मुलींना सांभाळायला रोज सकाळी ७ ते ६ पर्यंत जात होती. एलिझाबेथला मार्गारिट उर्फ मॅगी व कॅथेलीन उर्फ केट नावाच्या दोन जुळ्या मुली होत्या.  सातव्या महिन्यात बाळंतपण झाल्याने त्या मुली वजनाने खूपच कमी होत्या व त्यात मॅगीला थोडा प्रॉब्लेम होता. तिचे डोके नेहमीच्या आकारापेक्षा थोडे मोठे होते , त्यामुळे एलिझाबेथ त्या मुलींना पाळणाघरात ठेवू शकत नव्हती. एलिझाबेथ मलाही चांगली ओळखत  होती कारण ज्या पाळणाघरात पर्यायी बेबीसीटर म्हणून मी काही महिने काम केले तिथे तिचा मोठा मुलगा पण होता. मी दोघींनाही दूरध्वनी करून सांगितले की मला इतक्या लहान मुलांची व त्यातून ही जुळ्यामुलांची देखभाल करायची सवय नाही, पण शिकवलेत तर हे काम मी निश्चितच करू शकेन. त्या जुळ्या मुलींची दिवसभरात कशी देखभाल करायची याचे मी दीडदिवस प्रशिक्षण घेतले, अर्धा दिवस एलिझाबेथ बरोबर व एक संपूर्ण दिवस माझ्या मैत्रिणीबरोबर. एलिझाबेथ ने मला पावडरचे दूध कसे तयार करायचे, दुधाच्या बाटल्या स्वच्छ धुऊन मायक्रोवेव्हमधून कशा कोरडया करायच्या, बाटलीत दूध भरून ते फ्रीजमध्ये कशा पद्धतीने ठेवायचे, म्हणजे दुधांच्या बाटल्यांवर स्टीकर चिकटवून त्यावर नावे लिहायची. शिवाय केटला दुधातून तांदुळाची पावडर घालून दूध पाजायचे हे लक्षात ठेवायचे. पावडरचे दूध तयार करताना अजिबात गुठळी होवून द्यायची नाही वगैरे. मैत्रिणीबरोबर एक संपूर्ण दिवस प्रशिक्षण घेतले त्यात तिने मला सांगितलेल्या गोष्टी खालीलप्रमाणे;

१. दर ३ तासाने बाटलीतील दूध पाजणे व ते कशा पद्धतीने पाजणेः सोफ्यावर बसून मांडीवर उभी उशी ठेवायची , त्यावर मुलीला उताणे झोपवायचे , एका हाताने तिचे दोन्ही हात धरून बाटलीतील दूध पाजणे. दुसरे महत्वाचे म्हणजे दूध पिताना त्यांना ठसका लागत नाहीना ते ही पाहायचे.

२. दर तीन तासाने डायपर बदलणे.

३. औषध कसे ड्रॉपरने तोंडात घालायचे.

४. फोननंबर ची यादी कुठे आहे ते सांगितले, त्यामध्ये एलिझाबेथचा व तिच्या नवऱ्याचा सेलफोन नंबर, या दोघांच्या कार्यालयातील फोन नंबर, एलिझाबेथच्या शेजारणीचा फोन नंबर असे सगळे फोन होते.

५. त्या मुलींना ताप आला तर तो थर्मामीटरने कसा पाहायचा.

६. सकाळी ११ वाजता एलिझाबेथच्या कार्यालयात दूरध्वनी करून सांगायचे की ‘सर्वकाही व्यवस्थित चालले आहे, काळजी नसावी.’ ती फोनवर भेटली नाहीतर आन्सरिंगमशीनवर निरोप ठेवणे.

७. त्या मुलींना झोपवायचे कसे ते सांगितले. त्या मुलींच्या खोलीत दोन पाळणे आहेत त्यात त्यांना पालथे ठेवून झोपवायचे. नंतर दार अर्धवट लावून घ्यायचे.

८. अर्धा पाउणतास सतत कोणी रडले आणि सर्व उपाय करूनही रडणे थांबले नाहीतर फोनच्या यादीतून फोन लावून लगेचच कळवणे. फोनवर

कोणीही उपलब्ध झाले नाहीतर ९११ ला फोन करुन पोलिसांची मदत घेणे.

९. जाताना एलिझाबेथ संपूर्ण घर बंद करुन जाईल. बाहेरुन कोणीही आलेतरी दार उघडू नकोस असे सांगितले.

१०.त्या मुलींशी सतत बोलत राहा.

११.फ्रीजमध्ये कायम त्या दोघींच्या मिळून ८ दुधाच्या बाटल्या तयार ठेवणे.

प्रत्यक्षअनुभव : दीडदिवसाचे प्रशिक्षण घेतल्याने प्रत्यक्ष सांभाळायला मला काहीही जड गेले नाही. मुलीपण खूप गोड व छान होत्या. पहिल्यांदा मला पाहिल्यावर आज ही कोण आपल्याला नवी बाई आली सांभाळायला? अशाप्रकारचे अविर्भाव चेहऱ्यावर होते, पण ते २ सेकंदच टिकले. त्यांच्याकडे हासून बोलल्यावर त्याही हसल्याव रमल्याही.एक दिवस त्यांच्याशी इंग्रजीतून बोलले, मग विचार केला त्यांना काय कळतय इंग्रजी का मराठी ?नंतर मनसोक्त मराठीतून च बोलले त्या मुलींशी.'उठलात का तुम्ही?', 'तुम्हांला भूक लागली का?', 'एक मिनिट हं आलेच मी' अशाप्रकारे .एके दिवशी भुकेच्या वेळी केट पेंगली होती, मग तिला तसेच झोपू दिले, मॅगीला आधी दूध दिले तरीही ती उठेना. मग विचार केला आता जर केटला तसेच झोपू दिले तर पुढचे सगळे वेळापत्रक बिघडेल, तशीच तिला जबरदस्तीने उठवले, दूध दिले, मग झाली ताजीतवानी आणि लागली खेळायला. मॅगी लहान आहे, ती दूध प्यायल्यावर लगेच झोपायची.केट चपळ आहे व दूध प्यायल्यावर ती खूप खेळायची. मग ती व मी टॉम व जेरी पाहायचो. त्या चार दिवसात खूप लळा लागला होता मला त्या गोड मुलींचा. आलिशान बंगल्यामधील केट-मॅगी यांच्या सहवासातील ते चार दिवस मी कधीही विसरणार नाही.

त्या ४ दिवसात कळाले की ही नोकरी खूप जिकीरीची आहे. सतत लक्ष ठेवावे लागते. संपूर्ण घरात त्या मुलींशिवाय कोणीही नाही. दार उघडून बाहेरही जाता येत नाही आणि अशी नोकरी ८ ते १० तास करायची म्हणजे डोक्याला खूप ताण आहे. आणि इतक्या छोट्या मुलींना सांभाळणे म्हणजे खूप मोठी जबाबदारी पण आहे. रेणुकाने ही नोकरी त्या मुली मोठ्या होईपर्यंत केली. तिचे मला खूप कौतुक आहे. तिचा नवरा पिएचडी करत होता. पिएचडीमध्ये शिष्यवृत्ती खूप कमी असते. त्यामुळे रेणुका ही नोकरी करत होती. तिच्या डिपेंडंट विसावर वर्कपर्मिट नव्हते पण तरीही ही नोकरी करत होती. कारण एलिझाबेथला पण गरज होती. त्यामुळे दोघींनाही गरज असल्याने त्या दोघी एकमेकींना सांभाळून घ्यायच्या. एलिझाबेथ रेणुकाला कॅश पैसे देत होती. तसेच मला पण तिने ४ दिवसांचे कॅश पैसे दिले. मी ४ दिवस पर्यायी गेल्यामुळे रेणुका व तिच्या नवऱ्याला ४ दिवस बाहेरगावी जाता आले नाहीतर सुटणूकाच नाही. रेणुकाने माझे खूप आभार मानले व मी ही तिचे आभार मानले कारण की मला पण एक नवीन अनुभव मिळाला.



# ११) आमचा पहिलावहिला लांब पल्लयाचा कार प्रवास

अमेरिकेत आल्यावर बरीच वर्षे आम्ही (चारचाकी) गाडी घेतली नव्हती, कारण विद्यापीठातील बससेवा चांगली होती. घराच्या जवळच बसथांबा होता.विद्यापीठात जाणेयेणे व इतर सर्व गरजेच्या ठिकाणी बसमधून जाणे सोयीचे होते.दुसरे म्हणजे मुंबईत वाहन चालवायची वेळ कधीच आली नव्हती आणि तसेही ती वेळ कधी येतच नाही.

२००१ साली अमेरिकेत आल्यानंतर सुमारे चार वर्षांनी आम्ही गाडी खरेदी केली.विनायकने चारचाकी शिकण्याचे काही धडे घेतले आणि थोडा सरावही सुरू केला. सराव केल्यावर आम्ही आमच्या चारचाकी मधून किराणासामान आणि भाजीपाला आणायला जाऊ लागलो. बराच सराव केल्यावर विनायकने परीक्षा दिली आणि त्याला चारचाकी चालवण्याचा पक्का परवाना मिळाला. काही दिवसातच आम्हाला लांबपल्ल्याच्या मुक्कामी जायची संधी मिळाली. विनायकच्या मित्राने एका समारंभाचे निमंत्रण फोनवर दिले आणि म्हणाला 'गाडी असल्याने आता तुम्हाला आमच्याकडे यायला काहीच हरकत नाही.तुम्ही याच. ' विनायकने जायचे ठरवले तरी पण मी नाखुष होते. मी म्हणाले 'आपण विमानाने जाऊना, नाहीतर इथेही काही बससेवा असतीलच की त्या गूगलवर शोधू आणि बसने जाऊ.' कार असताना बसने प्रवास करण्याची कल्पना विनायकला खूप हास्यास्पद वाटली. मी नाखूष होते याचे कारण मला गाडी अजिबात आवडत नाही. मला बसने किंवा आगगाडीने प्रवास करायला खूप आवडतो. कोणतेही वाहन रस्त्यावर न चालवल्यामुळे मल आत्मविश्वास वाटत नव्हता. खरे तर विनायक कार चालवणार होता. तो नवशिका असल्याने आणि परक्या देशात कारने जाताना अपघात झाला तर ? किंवा रस्ता चुकला तर ?

अशा शंका उगाचच मनात फेर धरुन होत्या, मी जाम गंभीर झाले होते.मनात म्हणाले, तुला काय! तू फक्त गाडी व्यवस्थित धावते आहेना इकडेच पाहणार. मलाच नकाशा वाचून दाखवायचा आहे पोथीसारखा! म्हणजे माझी जबाबदारी जास्त! याहू नकाशा आणि मॅपक्वेस्ट नकाशा असे जाण्यायेण्याचे प्रत्येकी दोन नकाशे शोधले, त्याच्या छापील प्रती काढल्या, व नीट अभ्यास केला. नशिबाने दोन्ही नकाश्यांनी जाण्यायेण्याचे रस्ते एकच दिले होते. फरक इतकाच होता की दोन्हीमध्ये जाण्याचा रस्ता येण्याच्या रस्त्याहून वेगळा होता. मैल किती, रस्तेबदल (एक्झिट्स) किती, सर्व पाहिले. त्यात एकूण सहा रस्तेबदल होते.सर्व तयारीनिशी सकाळी ९ ला बाहेर पडलो. गाडी सुरू केली. गाडीला हातानेच ३-४ वेळेला नमस्कार केला, असा नमस्कार तर मी अजूनही करते! माझ्या चेहऱ्यावरचे गंभीर भाव बघून विनायक म्हणाला 'काळजी करू नकोस. मी पण नवशिकाच आहे त्यामुळे रस्त्यावर जी कमाल वेगमर्यादा ठरवून दिली आहे त्यापुढे नक्कीच जाणार नाही. आणि तूही नकाश्याचा अभ्यास केला आहेस ना, मग काळजी कसली? मी म्हणाले 'अरे हो, पण तरीही पहिलाच प्रवास आहे आणि तोही लांबपल्याचा त्यामुळे मला थोडी भीती वाटत आहे.'

विनायकने कार सुरू केली.कारमधल्या मैलांचा आकडा पाहिला आणि तो कागदावर लिहिला. पहिली एक्झिट किती मैलावर येणार आहे त्यावर कारमधल्या मैलाचा आणि नकाशातील मैलांच्या माझ्या बेरजा-वजाबाक्या सुरू झाल्या.

प्रवास ६- ७ तासांचा, साधारण ३५० मैलांचा (५५०किमीचा) होता. गाडी चालवण्याचा कायमचा परवाना मिळून आठवडाच झाला होता. प्रवासाच्या आधीच्या आठवड्यात महामार्गावर जाऊन येऊन थोडा प्रवास केला. एक चाचणी घेतली. जन्मात कधी गाडी चालवण्याची वेळ आली नव्हती आणि महामार्गावर तर अजिबातच नाही. ही चाचणी घेतल्याने

माझी भीड थोडी चेपली, पण तरीही पुढे काय अडचणी येऊ शकतील अशी एक भीती ही मनात होतीच. गाडी सुरू केल्यावर थोड्या वेळाने शहर सोडून महामार्गावर जाण्यासाठी एक एक्झिट लागली. ती एक्झिट लागल्यालागल्या माझी बडबड सुरू झाली. 'हळूरे ! वेग कमी कर! बापरे! किती मोठी एक्झिटआहे!' पूर्णपणे वर्तुळाकार आणि उंचावरून खाली येणाऱ्या रँपवरून जाताना तर मी माझा श्वास रोखून ठेवला होता. आता महामार्गावरून आमची गाडी जलद धावत होती. म्हणजे कमाल मर्यादेपेक्षा कमीच, पण आम्हाला इतकाही वेग नवीन असल्याने जास्त वाटत होता. मजा वाटत होती. एकाच रांगेतून नुसते धावत सुटायचे. कोणताही अडथळा नाही हे पाहून माझी भीड चेपत होती. अचानक विनायकने उजवी रांग सोडून डाव्या रांगेत गाडी आणली आणि वेगही वाढवला .परत माझी बडबड सुरू. 'हे काय ? डाव्या रांगेत कशाला ? वेग कमी कर.' पण मी आता जर काही जास्त बोलले तर दोघांच्या चिडचिडीमध्ये अपघात होईल या भीतीने 'चुपचाप' बसले. उजव्या रांगेत जो ट्रक होता त्याला ओलांडून त्याच्या पुढे विनायकने गाडी परत उजव्या रांगेत आणली आणि म्हणाला 'आता कळाले का मी डाव्या रांगेत का आलो ते ?अगं, अशा धुडांना मागे टाकण्यासाठी असे करावेच लागते, नाहीतर आपल्याला 'हळूहळू' करत जायला लागले असते.' तसे ते मला पटलेही होते पण डाव्या रांगेतून जेव्हा विनायक कार अतिजलद वेगाने ट्रकच्या पुढे नेत होता तेव्हा तर मी खूप 'स्तब्ध' झाले होते! हळूहळू माझा आत्मविश्वास वाढत होता. गाडीच्या वेगाने धावण्याची सवय झाली आणि प्रवासाचा आनंदही वाटायला लागला. सर्व एक्झिटा व्यवस्थित पार केल्या. माझे मैलांचे आणि एक्झिटांचे गणितही अगदी बरोबर चालले होते .इतका वेळ छान चाललेला प्रवास शेवटी थोडा कंटाळवाणा झाला. प्रवास करून बराच वेळ झाला होता त्यामुळे ७४/७६ जोड महामार्ग कधी एकदा संपतोय आणि विल्मिंग्टन शहराचा

चेहरा कधी एकदा पाहतोय असे झाले होते. शेवटी एकदाचे आम्ही विनायकच्या मित्राच्या घरी पोहोचलो. घरी पोहचता पोहचता मी विनायकला म्हणाले, ‘मी उगाचच घाबरत होते.अमेरिकेत लांबपल्ल्याचा प्रवास इतका अवघड नाहीतर! आता खूप छान वाटते आहे.’ त्यावर विनायक मला म्हणाला ‘तुझा आताचा चेहरा आणि सकाळचा चेहरा असे दोन वेगळे फोटो काढून ठेवायला पाहिजे होते’ त्यावर मी ‘हाहाहा, आता माझा आत्मविश्वास वाढला आहे’, असे सांगितले. दुसऱ्या दिवशीचा निरोप समारंभ आटोपून निघालो. मित्र म्हणाला ‘जाताना शार्लोटवरून का नाही जात ? एकदम सरळ रस्ता आह’ त्याला म्हणालो ‘नको पहिलाच मोठा प्रवास आहे हातात असलेल्या नकाश्यावरूनच जातो’ गाडी सुरू करून त्याला टाटा, बाय-बाय केले. परतीच्या प्रवासाला निघताना उलटा सीन होता. माझ्या आत्मविश्वासाने खूप उंची गाठली होती.विनायकच्या चेहऱ्याकडे बघितले तर त्याचाही आत्मविश्वास वाढलेला जाणवत होता. परतीच्या प्रवासाचा नकाशा हातात घेऊन बसले. ज्या रस्त्याने आलो अगदी त्याच रस्त्याने परत असा हा नकाशा नव्हता. थोडा वेगळा होता. महामार्ग ७६ वर १२० मैल जायचे होते, नंतर दुसरा रस्ता पकडायचा होता. आम्ही ७४/७६ जोडमार्गाने निघालो आणि १२० मैल गेल्यावर अपेक्षित दुसरा रस्ता कुठे आहे बघायला लागलो. मैल थोडे मागेपुढे होऊ शकतात म्हणून आणखी २५ - ३० मैल पुढे गेलोतरी अपेक्षित रस्ता दिसेना. दरम्यान अशी ही ज्ञान प्राप्ती झाली की ७४/७६ जोडमार्ग जाऊन सध्या फक्त ७४ सुरू आहे म्हणजे महामार्ग ७६ केव्हातरी वेगळा झाला आणि त्याचा फाटा कुठे येतो हे नकाश्यात न सांगितल्याने हा गोंधळ झाला होता. समोर शार्लोट शहर ७०-८० मैल असल्याचे फलक दिसायला लागले.मित्र म्हणाला तसे शार्लोट वरून जाता आले असते पण बरोबर नकाशा नव्हता.

रस्त्यावर कोणीही नव्हते. एखादीच कार धावताना दिसत होती. निर्मनुष्य मोकळा रस्ता मनात भीती निर्माण करत होता. आम्ही दोघेही पेचप्रसंगात पडलो होतो. ऐन थंडीचे दिवस होते त्यामुळे दिवसही लवकर लहान होत होता. हळूहळू सूर्यप्रकाश कमी होत होता. आता काय करायच? नक्की कुठे जायचे ? कोणतीही एक्झिट दिसायला तयार नव्हती. विनायक म्हणाला 'आपण उलटे परत फिरू' पण उलटे फिरायला यूटर्नही दिसत नव्हता. मी म्हणाले 'छे, उलटे फिरायला नकोरे. अंधार पडायला सुरवात झाली आहे.आपण खूप अंतर पुढे आलो आहोत. उलटे फिरून ७६ चा फाटा दिसला नाहीतर काय करायचे?' त्यावेळी आमच्याकडे सेलफोन नव्हता. फक्त याहू – मॅपक्वेस्ट नकाश्यांचा आधार होता. मला तर रडू कोसळायच्या बेतात होते. जवळ एकही पेट्रोलपंप दिसत नव्हता.हा काय प्रकार आहे ? पेट्रोल म्हणता लक्ष गेले तर तेही संपत आले होते. दोघेही केविलवाणे झालो. तेवढ्यात एक यूटर्न दिसला आणि डाव्या बाजूला एक सरळ जाणारा रस्ताही दिसला. रस्त्याचा चौक असतो तसे काहीतरी वाटले. मी लगेच ओरडले 'लवकर घुसव गाडी समोरच्या रस्त्याला. तिथे काहीतरी मिळेल आपल्याला. आता सरळ जाणे नको.' डावीकडे जाण्याऱ्या सरळ रस्त्यावर कार नेली खरी पण लगेचच एक यूटर्न घेऊन विनायकने कार परत मुख्य रस्त्यालाच आणली.मी म्हणाले' हे काय?' विनायक म्हणाला 'आपण याच रस्त्याने सरळ जाऊ. पुढे आपल्याला शार्लोट नक्की लागेल.' मी म्हणाले 'आणि नाही लागले तर ?' विनायकने रागाने माझ्याकडे पाहिले. माझ्याही लक्षात आले की आता आपणही थोडे धीराने घेतले पाहिजे. त्या ओसाड रस्त्यावरही आम्हाला जंगलात येऊन अडकल्यासारखे वाटत होते.मी कोणतीही बडबड न करता शांत बसले खरी पण माझ्या मनात वाईट विचारांचे थैमान सुरू झाले. कोणत्याही क्षणी ठप्प अंधार होईल, पेट्रोल संपेल आणि गाडी रस्त्याच्या एका बाजूला लावून मागचे लुकलुकणारे दिवे

लावून कोणी दिसते का ते पाहून आणि दिसले तर त्याला हातवारे करून ' मदत करा' असे करावे लागेल. आणि असे केले तरी कोणी मदतीला येईल का? मदतीला येण्याकरता एकही गाडी जाताना दिसत नव्हती. ती सोडा, एखादे चिटपाखरू पण दिसत नव्हते. ९११ पोलिसांचा नंबर मदतीसाठी फिरवावा तर फोनही नाही. आता मात्र मी मनातल्या मनात देवाचा धावा करू लागले. काहीतरी दिसू दे. पेट्रोलपंप नाहीतरी एखादे शॉपिंग कॉम्प्लेक्स तरी दिसू दे म्हणजे तिथे कार थांबवून पुढे काय करायचे हे सुचेल. तेवढ्यात शार्लोट शहर काही मैलांवरच आहे असे दर्शवणाऱ्या हिरव्या पाट्या दिसू लागल्या. विनायक म्हणाला, ' आता काही मैलांवर शार्लोट येईल. तू फक्त कुठे पेट्रोलपंप दिसतो का यावर लक्ष ठेव.' माझा परत धावा सुरू झाला, 'देवा देवा, लवकर पेट्रोलपंप दिसू दे.' पेट्रोल संपण्याच्या निर्देशकावर माझे लक्ष होतेच. काटा पुढेपुढे सरकत होता आणि तेवढ्यात दूरवर काहीतरी आहे असे दिसले. नशिबाने तो एक छोटा पेट्रोलपंपच होता. पेट्रोल भरले. बाजूच्या दुकानात जाऊन कोकाकोला व पाणी विकत घेतले. थोडे बटाटा चिप्स घेतले. तोंडचे पाणी पार पळाले होते. गाडीमध्ये पेट्रोल भरल्यावर आणि कोरड्या घशात पाणी गेल्यावर बरेच हायसे वाटले. थोडीफार चिंता मिटली होती पण आता कोणाला विचारायचे की हा रस्ता कोणता आणि पुढे कसे जायचे? नशिबाने तिथे दोनचार गाड्या उभ्या असलेल्या दिसल्या.त्यात एक छोटा ट्रकटेम्पो होता. तो निघणार तितक्यात त्या वाहनचालकाला हात दाखवून थांबवले व विचारले' हा आमचा नकाशा. हा रस्ता कोणता आहे आणि क्लेम्सनला कसे जायचे?' त्याने टेम्पोतून कागदी मोठा नकाशा काढला आणि सांगितले ' ७६ केव्हाच मागे पडला. क्लेम्सनला जायचे तर सरळ जा, शार्लोट लागेल. तिथून महामार्ग ८५ दक्षिण घ्या, एक्झिट १९ बी वरून क्लेम्सनला जाता येईल.' विनायकने विचारले ' महामार्ग ८५ किती अंतरावर लागेल? ' तो म्हणाला 'तुमच्या

नजरेतून महामार्ग ८५ सुटूच शकत नाही इतका ठळक आहे, तेव्हा तो आला की समजेलच. त्याचे आम्ही अनेकदा आभार मानले व गाडी सुरू केली.

अंधार पडला होता. त्या माणसाने सांगितलेले एक्झिट क्रमांक व महामार्ग क्रमांक मी लिहून घेतले होते. आता मात्र डोळ्यात तेल घालून बघण्याची वेळ आली होती. इथे महामार्गावर दिवे नसतात. आपल्या गाडीच्या पुढच्या दिव्याचा झोत पडेल तितकाच रस्ता दिसतो आणि हिरव्या पाट्या दिसतात ज्यावर कोणते शहर पुढे येणार किंवा कोणती एक्झिट येणार हे दिसते. आता माझे मैलाचे हिशेब संपले. नजर फक्त समोर आणि तीक्ष्ण. पहिल्या प्रवासात अंधारात गाडी चालवण्याचेही नशिबात लिहिले होते.आता शार्लोट शहरातून जात असल्याने झगमगाट, दुकाने, मोठ्या इमारती दिसायला लागल्याने थोडे माणसांत आल्यासारखे वाटले.अर्थात शहरातून गर्दीमुळे, कमी वेगमर्यादेमुळे, शहरातल्या रस्त्यांची नीट कल्पना नसल्याने आणि महामार्ग ८५ केव्हा येणार याबद्दलच्या अनिश्चिततेने गाडी हळूहळू चालवत होतो.

महामार्ग ८५ एक्झिटची पाटी दिसली आणि आम्ही दोघेही अतिदक्ष झालो. तेवढ्यात महामार्ग ८५ दक्षिणची एक्झिट डावीकडे असल्याची खूण दिसली आणि एक्झिट उजवीकडे येईल या अपेक्षेने आमची गाडी अगदी उजव्या रांगेत. मधल्या तीन-चार रांगा पार करून एक्झिट घेणार कशी? माझा परत आरडाओरडा सुरू.विनायकला म्हणाले, ‘ विनायक, एक्झिट डावीकडे आहे. तू एकदम डाव्या रांगेत जाऊ नकोस. खूप गाड्या येत आहेत आणि त्याही खूप जोरात! ‘ डावीकडे जायचा सिग्नल दिला होता आणि काही सेकंदांसाठी आम्ही चक्क आमची गाडी थांबवली. आमचा नवशिकेपणा जाणवून बाजूच्या रांगेतल्या गाड्याही काही सेकंदांकरता थांबल्या व आम्ही डावीकडे झटकन गेलो व एक्झिट घेतली. एक्झिट

घेऊन ८५ दक्षिणमहामार्गाला लागल्यावर एक सुटकेचा निःश्वास टाकला ! मी म्हणाले, ‘बापरे! काय हा भयंकर अनुभव!‘ विनायक म्हणाला, ‘चालायचेच. सर्वांना काही ना काही अनुभव येत असतात, आपल्यालाच असे वाटते की आपणच दिव्यातून जात आहोत.‘ मी म्हणाले, ‘तेही खरे आहेच. फक्त बाकीचे त्यांचे अनुभव उघडपणे सांगत नाहीत. बाकीच्यांचे अनुभव आपल्यापेक्षाही खतरनाक असतील.’

आता आम्ही महामार्गावर मधल्या रांगेतून जात होतो. नुकत्याच आलेल्या अनुभवामुळे एक्झिट आता कुठेही येऊ शकते त्यामुळे मधल्या रांगेत असलेले चांगले म्हणजे एक्झिट पाहून झटपट हालचाल करता येईल. माझी नजर आता चौफेर भिरभिरू लागली. क्लेम्सनची एक्झिट चुकता कामा नये कारण आता परत सव्यापसव्य करायची ताकद उरलेली नव्हती. कधी एकदा आपले घर येते असे झाले होते. काही वेळाने क्लेम्सनला जाण्यासाठीची एक्झिट १९ बी दिसली आणि जीव भांड्यात पडला. पुढे अर्ध्या तासात घरी पोचलो. आश्चर्य म्हणजे इतके सगळे नाटक होऊनही अगदी सात तासांमध्ये सुखरूप पोचलो होतो. ऐन हिवाळ्याचे दिवस असल्याने थंडी प्रचंड पडली होती. घरात गेलो आणि हीटर चालू केला आणि गरमागरम चहा करायला टाकला. घरात आल्यावर उबदारही वाटत होते आणि सुरक्षितही! चारचाकीच्या आमच्या पहिल्या वहिल्या अनुभवामध्ये मोलाची भर पडली होती!



# १२) अपार्टमेंट नंबर सी सेव्हन

अपार्टमेंट नंबर सी. सेव्हन हे पाहताक्षणी मला खूप आवडून गेले. त्या घराची रचना आम्हाला दोघांनाही आवडली. हॉल व दोन बेडरूम यांना सीलींग फॅन होते आणि ते आमच्यासाठी खूप महत्त्वाचे होते. हॉलच्या दोन्ही बाजूने बाल्कन्या होत्या. हॉलच्या एका बाजूला मुख्य दार व दुसरी बाजू सरकत्या दाराची होती. ही दोन्ही दारे उघडी ठेवली की हवा खेळती रहायची. खेळत्या हवेच्या झुळूका जेव्हा अंगावरून जायच्याना तेव्हा खूप छान वाटायचे. या दोन दारांच्या मध्ये आम्ही सोफ्याच्या स्टाईलची आरामदायी खूर्ची ठेवली होती. त्या खुर्चीवर बसले की खेळती हवा अंगावर यायची. या खुर्चीवर मी मांडी घालून जेवायला बसायचे, मी फोन वरून बोलायचे. व विनायक पोथी वाचायचा. ही खुर्ची खास रेसिपींच्या फोटोसाठीही होती. त्यावर मॅट ठेवून त्यावर डीश ठेवायचे. त्यात तयार केलेला पदार्थ असायचा. शिवाय सणावारी विविध पदार्थांनी तयार केलेली ताटेही या फोटोत असायची. ही खुर्ची आमच्या कायम लक्षात राहील इतकी छान होती.

जेव्हा या अपार्टमेंटमध्ये आलो तेव्हा सर्व खोल्या रिकाम्या होत्या. आमच्याकडे भारतावरून आणलेल्या चार बॅगा, एक डेस्कटॉप व एक टिल्लू टी.व्ही. होता. ज्या दिवशी या अपार्टमेंटमध्ये रहायला आलो तेव्हा काहीही करावेसे वाटत नव्हते. मन पूर्णपणे क्लेम्सनमध्येच अडकलेले होते. संपूर्ण एक दिवस आम्ही आमच्या फर्निचर खरेदीसाठी घालवला. एका बेडरूममध्ये एका टेबलावर आमचा डेस्कटॉप विराजमान झाला. त्याच्या बाजूला एक कॉटही बसली. तिथेच फोन व इंटरनेट कनेक्शनही आले.ही खोली पुढे माझीच होऊन गेली होती. क्लेम्नसचे घर सोडताना

त्या घराची आवराआवरी करून दमायला झाले होते. त्यात भर म्हणजे आम्ही कारने प्रवास करून आलो होतो. प्रवासाला ६ ते ७ तास लागले होते. ऐन थंडीचे दिवस होते. या घराचा ताबा घ्यायच्या आदल्या दिवशी विनायकच्या मित्राकडे एक रात्र राहिलो. सकाळी उठून घराचा ताबा घेतला. आमच्या भारतावरून आणलेल्या चार मोठाल्या बॅगा, आणि सामानाने बांधलेली खोकी या अपार्टमेंटच्या कार्यालयात येऊन पडली होती. आम्ही तशी विनंती केली होती की आमचे सामान ठेवून घ्या. आम्ही येतच आहोत. जडजड खोकी आणि सामानाने तुडूंब भरलेल्या मोठाल्या बॅगा विनायक व त्याच्या मित्राने घरात आणल्या. मी छोट्या बॅगा आणल्या. आमचा डेस्कटॉप , ट्रान्झिस्टर आमच्या कारमधून उचलून घरात आणला. सकाळी सकाळी जिन्यावरून चढउतार करून व जडजड सामान उचलून आम्हाला दोघांनाही खूप दमायला झाले होते. प्रचंड प्रमाणात भूक लागली होती. जवळच असलेल्या पिझ्झाहट मधून पिझ्झा खाऊन आलो. येतानाच ग्रोसरीस्टोअर मधून काही भाज्या आणल्या. थोडावेळ विश्रांती घेऊन बॅगा व खोकी उचकटायला सुरवात केली. नवीन शहर व नवीन जागा. संशोधन पर्व संपले होते. विनायकला नोकरी लागली होती. सर्व घर रिकामेच होते. होते ते सामान लावले . नव्या पर्वाला सुरवात झाली. विल्मिंग्टनमध्ये भारतीय जनता खूपच कमी होती. आम्हीच फक्त दोघेच्या दोघे एकमेकांना आधार होतो.

मनोगत हे मराठी संकेतस्थळ क्लेम्सन सोडण्यापूर्वी माहिती झाले होते. मनोगत वर येणाऱ्या कविता, लेख, चर्चा वाचण्यात आमच्या दोघांचा वेळ जाऊ लागला. विनायकची कंपनी घराच्या १० मिनिटांच्या चालत जाण्याच्या अंतरावर होती. त्यावेळेला याहू मेसेंजर होते. आर्कुट होते. मनोगत संकेतस्थळावरून अनेक मराठी मित्रमंडळी याहू मेसेंजरवर आली आणि आमच्या गप्पा सुरू झाल्या. त्यावेळेला गाणी ऐकण्यासाठी ऑनलाईन म्युझिक इंडिया होते. हवी तितकी गाणी ऐकायला लागलो. मनोगतावर

जेव्हा पाककृती विभाग सुरू झाला तेव्हा माझें रेसिपी लेखन सुरू झाले. मनोगतचा खूप आधार वाटायचा. नंतर मी माझे अनुभव आणि आठवणी लिहायला सुरवात केली. आवडलेल्या लेखनाला अभिप्राय द्यायचे. माझ्या दोन्ही ब्लॉगचे जन्म या घरातच झाले.आर्कुटवर एच ४ मराठी मंडळ व इंडियन होममेकर्स इन युएसए या दोन्ही समुदायात सहभागी झाले. तिथे एखाद्या रेसिपीची विचारणा झाल्यावर मी लगेचच माझ्या ब्लॉगवर लिहिलेल्या रेसिपीची लिंक द्यायचे. तिथे होणाऱ्या निबंधस्पर्धेत आणि पाककृती स्पर्धेत भाग घ्यायला सुरवात केली. रेसिपी-लेखनाबरोबर डिजिटल कॅमेऱ्याने पदार्थांचे फोटो काढणे सुरू झाले. बाहेर फिरायला जाताना फुलांचे, पानांचे, आकाशातील वेगवेगळ्या आकारांच्या ढगांचे, सूर्योदय, सूर्यास्त व जे काही चांगले दिसेल ते ते सर्व कॅमेऱ्यात बंदिस्त होऊ लागले. लेखनाबरोबर फोटोग्राफीचा छंद जडला. असंख्य फोटो काढले. फोटोचा आकडा काही हजारात गेला. माझे रेसिपीलेखन वाढले. भारतात कधीही न केलेल्या पाककृती करायला लागले व त्या लगेच लिहायचेही. अनेक प्रकारच्या वड्या याच जागेत झाल्या आहेत. अपार्टमेंटला लागून असलेल्या बाल्कनीत उन्हाळ्याची वाळवणे केली. ३ वर्षे कशी गेली कळले नाही. भारतात कॉलींग कार्डवरून बोलायचो. त्यात आम्हाला १० डॉलर्सला २० मिनिटे मिळायची. नंतर ५ डॉलर्सला ६० मिनिटे मिळायला लागली, नंतर व्होनेज कंपनीचा फोन घेतला. त्यात मग एकच भला मोठा नंबर फिरवला की आईबाबा, सासूसासरे,बहिणीशी बोलता यायचे आणि ते सुध्दा अगणित मिनिटासाठी. शिवाय अमेरिकेत मित्रमंडळींशी अगणित बोलणे सुरू झाले. याहू मेसेंजरवर बोलणारी मित्रमंडळी हळूहळू पांगत गेली.गुगल टॉकवर खूप बोललो. स्काईपवर एकमेकांना पाहिले देखिल !

आम्ही डेस्कटॉप ठेवलेल्या बेडरूममध्ये बसून इतके काही बोललो आहोत की आम्ही साधे बाहेर फिरायलाही कधी बाहेर पडलो नाही.

आम्हाला एकटेपणा कधीच आला नाही ! असे वाटायचे की आपल्या घरात आपल्यासोबत बरीच मंडळी वावरत आहेत, इतके इंटरनेटचे माध्यम प्रभावी आहे. याच खोलीत मला झोप येत नसेल तर मेसेंजर ऑन करून जो कोणी असेल तिच्याशी मी बोलत बसायचे. काही वेळा जे काही लिहायचे ते मनात घोळत असेल तर मध्यरात्री उठून मी वहीत लिहिलेले आहे. माझ्या आठवणीतली दिवाळी हा लेख तर मी मध्यरात्रीत उठून मनोगतावर टंकला आहे.

आमचे घर वरच्या मजल्यावर होते. दोन घरांना मिळून एक मोठी बाल्कनी होती व त्याच्या मधोमध जिना होता. दुपारचा चहा मी काहीवेळा जिन्यात बसून प्यायला आहे. बाल्कनीच्या कठड्यावर येऊन काही पक्षी बसायचे. मुसळधार पाऊस झाला की अपार्टमेंटच्या आवारात असलेले तळे तुडुंब भरायचे. ते बघायचा मोह मी कधी टाळलेला नाही. बाल्कनीत उभे राहिले की उजव्या बाजूला सूर्योदय दिसायचा तर डाव्या बाजूला सूर्यास्त ! या अपार्टमेंटच्या आवारातील काही झाडांचे फोटो कायम लक्षात राहतील असे आहेत. स्प्रिंगमधले गुलाबी रंगाने डवरलेले झाड, फॉलमधले नारिंगी रंगाने डवरलेले झाड तर एक झाड हिवाळ्यात बर्फाने आच्छादलेले होते. त्याच्या पर्णहीन फांद्या बर्फाच्या वजनाने झुकल्या होत्या.

पहाटे जेव्हा मला आपोआप जाग यायची तेव्हा पक्षांची चिवचिव ऐकू यायची. बेडरूमला लागूनच एक झाड होते. तिथे पक्षी असायचे. हे पक्षी पहाटे पहाटे खूप छान गप्पा मारायचे. एकाने किलबिल केली की लगेचच दुसरा पक्षी त्याच्या आवाजात त्याला साथ द्यायचा. मधुनच तिसऱ्या पक्षाची त्याच्या आवाजातली साथ. वेगवेगळे आवाज एकमेकांना साथ देत आहेत हे ऐकून खूप छान वाटायचे. हा काळ साधारण पहाटे ५ते ६ च्या सुमाराचा असायचा. एकदा उजाडायला सुरवात झाली की पक्षांची किलबिल अचानकपणे बंद व्हायची.

एकदा जेव्हा मला अशीच पहाटे जाग आली तेव्हा पक्षांच्या गप्पा मी डिजिकॅम मधून टेप केल्या होत्या. काही वेळेला जेव्हा पहाटे जाग यायची तेव्हा मी खिडकीतून डोकावले की उजाडलेले दिसायचे. आकाशातही

सुंदर रंग जमा झालेले असायचे. दार उघडून बघायचे तर उजवीकडे क्षितिजावर लालसर छटा उमटलेली असायची. लगेचच कॅमेरा घेऊन खाली जायचे. हवेत एक प्रकारचा छान थंडावा असायचा. क्षितीजावर उमटलेली लालसर छटा छेदून सूर्याचा लाल गोळा हळूहळू सरकत वर यायचा. काही क्षणातच लालचुटूक गोळ्याचे पिवळ्या रंगात रूपांतर व्हायचे आणि नंतर पांढराशुभ्र सूर्य दिसायला लागायचा, डोळे दिपून जायचे. एकदा तर लालचुटूक सूर्याच्या पार्श्वभूमीवर आकाशातील रंग आणि ढगांचेही वेगळे रंग होते. आकाशात कुणीतरी पेंटींग केलयं असेच वाटत होते. सूर्योदयाची अशीच काही वेगळी रूपे मी कॅमेरात साठवलेली आहेत.शिवाय ती ली रिंगरलाही पाठवलेली आहेत. १४ न्युजकॅरोलायना या न्युज चॅनलवर हवामानतज्ञ ली रिंगर दिवसभराचे वेदर सांगायचा. रोज सकाळी तो वेदर शॉट ऑफ द डे ( Weather shot of the day ) मधे वेदरच्या संदर्भातले फोटो दाखवायचा.विल्मिंग्टन मध्ये राहत असताना अनेक सूर्यास्त आम्ही दोघानी पाहिले आहेत. लेखन फोटोग्राफी या बरोबर मी अपार्टमेंटच्या आवारात असलेल्या तळ्यावर रोज चक्कर मारायचे. तिथे बदके, कासवे होती. काही वेळा बगळे आणि करकोचे यायचे. हिवाळ्यात सीगल्स पक्षी यायचे. या तळ्याभोवती जी हिरवळ होती तिथे स्प्रिंग ऋतुमध्ये मला अनेक चिमुकली फुले दिसली आणि मी ती कॅमेरात बंदिस्त केली. आवाराच्या बाहेरच्या रस्त्यावर चालायचे. हळू हळू करत १-ते २ मैल चालणे वाढवले. शनिवार रविवार पैकी एक दिवस आम्ही दोघे खूप चालायचो. समुद्रकिनारी, नदीवर तळ्यावर साधारण १ते २ मैल चालणे व्हायचे. चालता चालता अनेकविध फोटोही काढत राहिले. एक दिवस साफसफाई व एक दिवस चालणे असे वीकेंडला रूटीन ठरून गेले.

जेव्हा मी हवामानतज्ञ ली रिंगरला वेदरशॉटसाठी फोटो पाठवत असे, ते तो वेदरचॅनल दाखवणार आहे का यासाठी मी रोज उठल्यावर मेल चेक करायचे. पण काही वेळा उठायला उशीर झाला तर विनायक मला उठवायचा आणि सांगायचा ''रोहिणी लवकर ऊठ, तू पाठवलेला फोटो दाखवत आहेत.'' असे म्हणल्यावर मी ताडकन उठायचे.

इंटरनेटची फेज संपली. एकटेपणा जाणवायला लागला. घरात बसून खूपच कंटाळा यायला लागला. प्रत्यक्ष माणसे बघण्यासाठी आणि बोलण्यासाठी घराबाहेर पडावेच लागते. मी घर बसल्या जरी बरेच उद्योग करत होते तरी एक प्रकारचा साचलेपणा आला होता. प्रत्यक्षातले मित्रमंडळ तीन वर्षे झाली तरी भेटलेच नव्हते आणि पुढे भेटतील याबद्दल खात्री नव्हती. क्लेम्सनला आल्यावर सुरवातीच्या काळात मी बसने बरीच हिंडले होते. येण्या जाण्यात वेळ जातो. मॉलमध्ये किंवा ग्रोसरी स्टोअर्समध्ये तिथल्या गोष्टी पाहण्यात वेळ जातो. त्यामुळे बसने हिंडायचे ठरवले.

आमच्या अपार्टमेंटच्या काही मिनिटांच्या अंतरावर बस येते हे माहीत होते पण तरी ती बस कुठे जाते याचा पत्ता नव्हता आणि नेमका बसस्टॉप कुठे आहे हेही शोधायचे होते. गुगलमध्ये आम्ही राहत असलेल्या शहरात कोणत्या बसेस धावतात हे शोधले. बसच्या वेबसाईटवर बघितले कोणत्या नंबराच्या बसेस धावतात, त्याचे वेळापत्रक काय आहे आणि मुख्य म्हणजे बसथांबे कुठे आणि किती आहेत. शिवाय प्रत्येक रूटचा मॅपही बघितला. या सर्व गोष्टींची एक प्रिंट काढली आणि आमच्या घराजवळचा बसस्टॉप कुठे आहे तेही शोधले. त्यावर किती नंबरची बस थांबते तो आकडाही पाहिला. लायब्ररीत जाण्यासाठी ही बस माझ्यासाठी खूपच सोयीची होती. म्हणजे आमच्या घरापासूनचा थांबा आणि लायब्ररी जवळचा थांबा १० मिनिटे चालण्याच्या अंतरावर होता. लायब्ररीत जायला सुरवात केली. नंतर लायब्ररीपासून दुसरी एक बस होती ती ग्रोसरी स्टोअर्स

आणि मॉलला जाणारी होती. त्यामुळे एक दिवसाआड बसने फिरायला लागले. घरातून निघताना धोपटीत पाणी पिण्याची बाटली, टोपी, एक स्वेटर, छत्री, थोड्या कुकीज अशी सगळी जय्यत तयारी करून निघायचे,कॅमेराही न्यायचे सोबत. लायब्ररीत जाण्यासाठी बसने जाण्यासाठी १५ मिनिटे लागायची.



# १३) लायब्ररीतले बुकरीपेअरिंगचे काम

## ( New Hanover County Public Library )

एकदा लायब्ररीत पुस्तके बदलताना तिथल्या बाईला विचारले की इथे नोकरी मिळू शकेल का ? तर ती बाई म्हणाली नोकरी नाही पण Voluntary Work मिळू शकेल.मग तिने मला एक फॉर्म दिला.मी तो दुसऱ्या दिवशी भरून दिला. फॉर्ममध्ये कोणकोणते काम आहे याची एक यादी होती. त्यावर मला आवडणाऱ्या कामावर टीकमार्क केले. काही दिवसानी लायब्ररीतून मला सुसानचा फोन आला कि तुझ्यासाठी एक काम आहे. मला येऊन भेट. मी लगेचच गेले तिला भेटायला, कारण की नुसते फिरण्यापेक्षा कामानिमित्त बाहेर पडणे केव्हाही चांगलेच. लायब्ररीच्या तिसऱ्या मजल्यावर सुसानला भेटले. तिने विचारले कि तुला बुकरिपेअरचे काम करायला आवडेल का ? त्या आधी हे काम कधी केले आहेस का? तर मी म्हणाले की हे काम मला नक्कीच आवडेल पण या कामाचा मला अनुभव नाही. सुसान म्हणाली काळजी करू नकोस. एलिझाबेथ तुला हे काम व्यवस्थित समजाऊन सांगेल. कोणत्या दिवशी आणि किती तास येशील? हे विचारल्यावर मी तिला आठवड्यातले २ दिवस आणि दुपारचे २ते ४ येईन असे सांगितले. एलिझाबेथने मला काम समजाऊन सांगितले. मला हे काम खूपच आवडून गेले. काम करताकरता रेडिओ ऐकता यायचा. त्यावर इंग्लिश गाणी आवडायला लागली होती. काही गाणी तर आरडी बर्मनने चाली लावल्यासारखी वाटायची. एकूणच रेडिओवर संगीत कोणत्या का भाषेत असेना मला ऐकायला आवडते.

गाण्याच्या अधूनमधून जाहीराती, गप्पाटप्पा, निवेदन असायचे त्याही ऐकायला छान वाटायचे. लायब्ररीत काम मिळाल्याने माणसात आल्यासारखे वाटले. व्यवधान असले की माणूस आपोआपच त्या व्यवधानाच्या अवती भवती फिरत राहतो. बाहेर पडले की घरातल्या कामाचीही आखणी करता

येते. लायब्ररीतील बरीच पुस्तके रिपेअर केली. साधारण हजार पुस्तके असतील.पण त्यांनी मला चहापाण्यापुरतेही पैसे दिले नाहीत. अर्थात अपेक्षा नव्हतीच.

मी माझा वेळ जाण्यासाठी काम करत होते आणि तेही आवडीने करत होते. तीन वर्षे हे काम केले. अजून दुसऱ्या प्रकारचे काम आहे का? असेही विचारले तर सुसान म्हणाली की दुसऱ्या विभागात मेल लिहून बघते काही काम आहे का ते. पण काम निघाले नाही. चहापाण्याचे पैसे जरी दिले नाही तरी माझ्या नावे दोन पुस्तके डोनेट केली आणि शिवाय ख्रिसमस पार्टीसाठी मला बोलावणे असायचे. माझ्यासारख्याच अजून काही जणी तिथे कामाला यायच्या. काम झाले की एका फायलीत नाव, किती तास काम केले आणि दिनांक टाकायचा असतो, तेव्हा कळाले की माझ्यासारख्या अजून काहीजणी इथे येतात तर ! लायब्ररीत मी बुक रिपेअरचे काम करत होते तेव्हा तिथल्या एका बाईने मला सांगितले की मी रिटायर होत आहे. तू माझ्या जागी अर्ज कर. तिने विचारले तुला अकांऊंट्स येते का? मी म्हणाले हो येते. मी कॉमर्स ग्रॅज्युएट आहे पण त्याला बरीच वर्षे झाली आणि मला त्यातला अनुभव पण नाही. त्याप्रमाणे मी सुसानला विचारले की मला अर्ज करायचा आहे तर तिने नन्नाचा पाढा वाचला, बरेच अर्ज येतील त्यात तुझा नंबर लागणार नाही. पण तरीही तिने सांगितलेल्या लायब्ररीच्या वेबसाईट वर जाऊन अर्ज केला. मला माहिती होतेच की काम होणार नाही पण तरीही अर्ज केला. फुलटाईम नोकरी होती जाता येता बसही होती आणि पेमेंटपण बऱ्यापैकी होते. मुलाखतीसाठी बोलावणे आले नाही. नंतर मी लायब्ररीची वेबसाईट चेक करत राहिले असता परत तिथे मला एक व्हेकन्सी दिसली. ती होती पार्टटाईमची. अर्ज केला आणि तेव्हाही मला मुलाखतीसाठी बोलावणे आले नाही. नंतर मी बूक रिपेअर करण्याचे काम सोडून दिले. लायब्ररीतले काम सोडून दिल्यानंतर आता पुढे काय? याचे विचारचक्र माझ्या डोक्यात सुरू झाले. क्लेम्सनला असताना

चर्चमध्ये काम केले होते तसे काम मिळू शकेल का? गुगल शोधामध्ये जवळपासच्या चालण्याच्या अंतरावर डे केअर आणि एक चर्च सापडले. ही दोन्ही स्थळे मी जेव्हा चालायचे तेव्हा मला माहिती होती पण आता नोकरीच्या निमित्ताने तिथे गेल, विचारले की इथे वेकन्सीज आहेत का ? माझ्याकडे ग्रीनकार्ड आहे त्यामुळे मी कायद्याने नोकरी करू शकते हे त्यांना सांगितले. शिवाय थोडाफार अनुभव आहे आणि त्या अनुभवांची रेको लेटर्स आहेत असे सांगितले.चर्चमध्ये आणि डे केअर मध्ये हे सर्व सांगितल्यावर त्यांनी मला एक अर्ज दिला तो मी तिथल्या तिथे भरून दिला. अर्ज भरून दिल्यानंतर त्यांनी सांगितले की आम्ही तुला कळवू. सध्यातरी आमच्याकडे कोणत्याही व्हेकन्सीज नाहीत. लायब्ररीच्या अनुभवानंतर मी शहाणी झाले होते. कोणत्याही अपेक्षा ठेवायच्या नाहीत आणि मुलाखतीसाठी बोलावणे येईल अशी वाटही बघायची नाही.

---------*--------

# १४)  केप फियर कम्यूनिटी कॉलेज -नॉर्थ कँपस

विचार करता करता घर बसल्या काही ऑनलाईन शिकता येईल का? म्हणून नेहमीप्रमाणेच गुगल शोध केला तर त्यात मला काही कोर्सेस सापडले. हे कोर्सेस दीड ते दोन किंवा काही ३-४ महिन्याचे होते. या सर्व कोर्सेसची फी ८०ते १०० डॉलर्स अशी होती. यातले ३ कोर्सेस मी एकही डॉलर न भरता पूर्ण केले. १४ न्यूज चॅनलवर एक बातमी पहिली. लायब्ररीचे कार्ड वापरून ऑनलाईन कोर्सेस फुकट करता येतील. फी भरायची आवश्यकता नाही. या ऑनलाईन कोर्सेसनंतर मात्र ओळीने जे काही घडत गेले ते खूप आनंद देणारे आणि आत्मविश्वास वाढवणारे होते!!

माझ्या शिक्षणाचा काळ येऊन ठेपला होता. या कोर्सेसमध्ये मी ३ कोर्सेस केले. कोर्स केल्यावर लगेच कोर्स पूर्ण केल्याचे सर्टिफिकेट देतात. यातले दोन कोर्सेस मी सोपे घेतले इंग्रजी ग्रामरचे की जे आपण सर्व शाळेत असताना शिकलो होतो. अजून एक कोर्स होता त्याचे नाव होते ''तुम्ही तुमचे पुस्तक बनवा'' हा कोर्स मला खूप आवडला. माझ्या लेखनाचे पुस्तक बनवता येईल  असे स्वप्न पाहिले. अमेझॉनवर ते पुस्तक ठेवता येईल व त्याची किंमत १ डॉलर ठेवता येईल. पण नंतर विचार केला आपला ब्लॉग आहेच. त्याचा चाहता वर्गही आहे. मग कशाला पुस्तक बनवायचे? तिथे अजून एक कोर्स होता तो म्हणजे एक्स्प्लोअर करिअर ऍज पॅरालीगल . हा कोर्स केला आणि मला तो फारच आवडून गेला. असे वाटले की हा कोर्स जर मी कॉलेजमध्ये जाऊन केला तर किती छान होईल?

पॅरालीगलचे शिक्षण प्रत्यक्ष कॉलेजमध्ये जाऊन घेण्याचा विचार केला तेव्हा परत गुगलशोध घेतला.आम्ही राहतो त्या शहरात कम्युनिटी कॉलेज होते. या कॉलेजचा मुख्य कँपस डाऊनटाऊनला होता.तिथे ये जा

करायला बसही सोयीची होती. नेमके त्याचवेळेला १४ न्यूज चॅनलवर कॉलेजची जाहीरात आली ती अशी की फॉल सेमेस्टरला रजिस्टर करा. अमुक तारखेच्या आत. या कॉलेजचा नॉर्थ कँपस आमच्या अपार्टमेंटच्या जवळ होता. तिथे जाऊन प्रत्यक्ष कॉलेज पाहिले. हे कॉलेज आम्ही रहात असलेल्या अपार्टमेंटच्या दुसऱ्या चौकात होते पण तरीही चालण्याच्या अंतरावर नव्हते. फॉल सेमेस्टर साठी रजिस्ट्रेशन केले. पॅरालीगलमध्ये ३ कोर्सेस होते. पहिला सर्टिफिकेट कोर्स, दुसरा डिप्लोमा आणि तिसरा डिग्री कोर्स. त्यात मी सर्टिफिकेट कोर्स करायचा ठरवला.'रजिस्ट्रेशन केल्यावर कॉलेजचे पत्र आले ते म्हणजे 'तुम्ही दोन प्रकारचे टॅक्सेस भरले आहेत का? आणि तुम्ही किती वर्ष या राज्यात रहात आहात?'या दोन्ही नियमांमध्ये मी बसत होते म्हणून मला इन-स्टेट फी लागू झाली. नाहीतर मला तिप्पट फी भरावी लागली असती. कॉलेजच्या वेबसाईटवर माहीती वाचली. प्रत्येक विषयाला किती क्रेडीट आहे ते कळाले. कॉलेजचे वेळापत्रक पाहिले. कोणत्या वर्गात बसायचे ते पाहिले आणि माझे कॉलेज जीवन सुरू झाले. विनायक रोज मला कॉलेजला न्यायला आणायला येत होता. आमच्या अपार्टमेंटच्या पुढच्या चौकात विनायकचे ऑफीस होते तर पुढील चौकात माझे कॉलेज होते. कारने अवघी ५ मिनिटे.

ज्या दिवशी कॉलेज सुरू झाले त्या दिवशी गणपती फेस्टिव्हलचा पहिला दिवस होता. मी घरातल्या घरात गणपतीच्या मूर्तीची पूजा करते आणि मोदकांचा स्वयंपाक करते पण मला काहीही करता आले नाही. आईने मला एक सुपारीत कोरलेला चांदीचा गणपती दिला होता. त्याची हळदकुंकू लावून आणि अक्षता वाहून पूजा केली. नैवेद्यासाठी वाटीमध्ये साखर ठेवली. नमस्कार केला आणि कॉलेजला गेले. पहिला दिवस छान होता. वर्गात काही तरूणी आणि काही मध्यमवयीन माझ्यासारख्या बायकाही

होत्या. सर्वांच्याच हातात जाडे पुस्तक होते. दुसऱ्या शहरात राहणारी माझी मैत्रिण तोषवीने सांगितले होते की इथे पुस्तके भाड्याने  घेतात. कॉलजमधून घरी आल्या आल्या ॲमेझॉनच्या साईटवर पुस्तक रेंट केले. पुस्तक घरी आल्यावर खूप धीर आला. Currin सरांनी पहिल्या दिवशी आम्हाला सर्वांना प्रिंट केलेला कागद दिला. त्यावर सर्व सिलॅबसमधले चॅप्टर , त्याच्या तारखा. त्यावर .असाईनमेंटच्या आणि परीक्षेच्या तारखा असे सर्व काही होते. कारभार खूपच पद्दतशीर होता. सर्टिफिकेट कोर्समध्ये दोन कोर्सेस होते. पहिला CIVIL Litigation Track Certificate आणि दुसरा Real Property Track Certificate .

मी पहिला करायचा ठरवला. त्यामध्ये प्रत्येकी ६ विषय असतात आणि क्रेडिट १८ होते. डिप्लोमाकरता १३ विषय आणि ३९ क्रेडिट होते तर डिग्री कोर्सला २५ विषय आणि ७५ क्रेडिट होते. सर्टिफिकेट कोर्सच्या विषयांसाठी Prerequisite  नव्हते.डिप्लोमामध्ये १३ पैकी दोन विषय होते ते म्हणजे गणित आणि इंग्लिश. या दोन्ही विषयाला Prerequisite होते.अजून एक विषय होता तो म्हणजे Public Speaking.

मी जेव्हा फॉल सेमेस्टरला ॲडमिशन घेतली तेव्हा २ विषय घेतले ते म्हणजे Introduction to Paralegal studies  आणि Business Law कॉलेजमध्ये घेतल्या जाणाऱ्या असाईनमेंट आणि परीक्षा ८ दिवसांनी असायच्या.कधी कधी दर ८ दिवसांनी परीक्षा आणि दर १५ दिवसानी असाईनमेंट. लेखी परिक्षेत १०० पैकी ७५ मार्क्स मिळाले की C grade असते. आणि ९० च्या पुढे मार्क मिळाले की A grade असते. डिग्री आणि डिप्लोमाला जे विषय होते ते काही जणांनी प्रत्येक सेमेस्टरला ५ किंवा काहींनी ३ घेतले होते. मी मात्र दोनच विषय घेतले होते आणि ते पूर्णपणे A grade मध्ये यशस्वी करायचे हे माझ्या आवाक्यात होते. अर्थात विनायकची मदत मला असाईनमेंट मध्ये खूपच झाली. तसेच इथले विद्यार्थी असाईनमेंट

ग्रूपने करतात. मी जेव्हा कॉलेजमध्ये जायचे तेव्हा एक चक्कर मी लायब्ररीत मारायचे तेव्हा तिथे काही विद्यार्थी घोळका करून अभ्यास करताना दिसायचे. त्यांच्या बाजूला पुस्तके आणि नाकासमोर लॅपटॉप असायचे. लॅपटॉप गुगलींग करण्यासाठी आणि असाईनमेंट वर्ड फाईल मध्ये टाईप करण्यासाठी. अगदी असेच चित्र आमच्या घरीपण असायचे.

विनायक घरी आला की आम्ही दोघे Assignment करण्यासाठी बसायचो. विनायक घरी यायच्या आधी मी असाईनमेंट मधला काही भाग पूर्ण करून word file मध्ये टाईप करून ठेवलेला असायच्या व काही गुगलींग करून ठेवलेले असायचे. गुगलींगमधे सापडलेल्या लिंक्स मी ब्राऊज केलेल्या खिडक्या बारीक करून ठेवायचे. जेवणासाठी आणि भांडी घासण्यासाठी अधून मधून ब्रेक घ्यायचो. असाईनमेंट टाईप करून गुगल केलेल्या लिंक्स पण कॉपी पेस्ट करून द्यायच्या असतात.लिंक्समधला काही भाग कॉपीपेस्ट केला तरी चालतो. नंतर असाईनमेंटची प्रिंट काढायची आणि ती प्राध्यापकांना द्यायची. आम्हाला शिकवणारे प्राध्यापक होते ते सर्व वकील होते. Mr, Currin सरांची एक लॉ फर्म होती तर Mrs. Clarke बाई अधून मधून कोर्टात ज्युरी म्हणून जायच्या. एखादी न्यूज अभ्यासासंदर्भात असली तर ती न्यूज युट्यूब वर बघायला सांगायच्या. विनायक मला म्हणाला 'तू चांगला कोर्स निवडला आहेस. तुझ्यामुळे मलाही लॉबद्दल माहीती होत आहे.'

'' टॉक टॉक टॉक '' असा आवाज आला की समजावे की Clarke बाई आल्या.! उंच टाचांच्या चपला. केस मोकळे, पेहराव वनपीस, गळ्यात मोठाल्या माळा, उजव्या हातात घड्याळ. डाव्या हाताने फळ्यावर लिहीणार. १० वाजून १० मिनिटे होत आली तरीसुध्दा अजून Mr, Currin कसे आले नाहीत ? आम्ही सर्वजणी माना वेळावून भिंतीवरच्या घड्याळात बघतो ना बघतो तोच करीन यांचा वर्गात प्रवेश ! सतत हसतमुख , प्लेन शर्ट व नेहमी टाय लावणारच ! शुक्रवारी Jeans आणि टी शर्ट . दोघांची रोल

कॉल घ्यायची पध्दत वेगळी होती. Mr, Currin वही उघडून प्रत्येकाचे नाव वाचणार व आम्ही ‘here ' असे म्हणले की ‘where 'असे म्हणून प्रत्येक विद्यार्थ्याकडे बघून हजेरी लावणार. मी आधी येस म्हणायचे मग हीयर असे म्हणायला लागले. Mrs. Clarke  बाईनी पहिल्यांदा रोलकॉल घेताना सगळ्यांचे चेहरे पाहून लक्षात ठेवले आणि नंतर प्रत्येकवेळी हजेरी लावताना बारीक डोळे करून पाहणार कोण कोण आलय? आणि मग त्यानुसार हजेरी लावणार. फॉल सेमेस्टर चांगल्या प्रकाराने (A grade ) यशस्वी झाल्यानंतर मी डिप्लोमा करण्यासाठी रजिस्टर केले.आधी सर्टिफिकेट कोर्स करण्याचे ठरवले होते, पण नंतर डिप्लोमा करण्याचे ठरवले.

Clarke बाईंची शिकवण्याची पध्दत मला आवडली. धड्यातले मुद्दे फळ्यावर लिहून नंतर प्रत्येक मुद्दा विस्ताराने सांगणार. Mr, Currin फळ्यावर एकही अक्षर लिहिणार नाही. धड्यातील २-४ वाक्ये वाचून दाखवणार व आमच्याकडून त्यांना चर्चा अपेक्षित असे. give an example Rohini, what do you think ? असे म्हणल्यावर मी उत्तर द्यायचे व लगेचच yes that's correct ! वर्गात शिकवत असताना मी निरिक्षण करत बसायचे. कोण काय काय करतयं ? कुणी नखं खातय. कुणाकुणाला बसल्या बसल्या डुलकी लागलेली असायची. कुणाला बरे नसेल तर तो बाकावर डोके ठेवून झोपायचा. तर कुणी फोनवर टेक्स्ट करत बसायचे. मध्येच कुणीतरी मागे वळून घड्याळ बघायचे. तसे तर मी पण काहीवेळा बघायचे मागे वळून तास संपायला किती वेळ आहे? कुणी पाणी पितय तर कुणी कोक पितय, तर कुणी वर्गात बसून विषयाच्या नोटस् लिहीतयं. एक ना दोन बरीच मजा बघायला मिळायची. मी लेक्चर ऐकताना एकीकडे वहीच्या पानावर नक्षी काढत बसायचे . हाहाहा . वेळ संपत आली की आम्ही सर्व पुस्तके वह्या दप्तरात ठेवायला लागायचो. करीन सर घड्याळाकडे बघून लेक्चर आवरते घ्यायचे आणि विचारायचे any questions?

इथे सेमेस्टरच्या पहिल्याच दिवशी त्या सेमेस्टरचा अभ्यासक्रम,

गृहपाठ, परीक्षा यांचे पूर्ण वेळापत्रक देतात. गृहपाठ खूप असतो. करीन यांच्या विषयाला दर १५ दिवसांनी २ टॉपिक वर परीक्षा व एका टॉपिकवर गृहपाठ असायचा. त्यातून २ विषय म्हणजे सततचे गृहपाठ आणि परीक्षा चालू असतात. डिप्लोमा किंवा डिग्री असेल तर एका सेमेस्टरला ३ किंवा ५ विषय घेतले तर वेळेत पूर्ण होऊन नंतर नोकरीसाठी प्रयत्न किंवा एकीकडे नोकरी व शिक्षण घेणारेही काहीजण आहेत. मला मात्र कशाचीच चिंता नव्हती .मी वेळ जाण्याकरता शिक्षण घेत होते. इथल्या परीक्षेत true or false, multiple choice, short answers असे असते . मला इथल्या कॉलेजचा अनुभव खूपच छान आला . घरातली कामे म्हणजे स्वयंपाक, कचरे टाकणे, भांडी घासणे, ग्रोसरी आणणे , साफसफाई, गृहपाठ, परीक्षा म्हणजे सततचा अभ्यास करून खूप दमायला होत होते पण मन खूप आनंदी रहात होते, कॉलेजला जाणे , त्या आधी पटापट आवरणे , अभ्यास करणे एकूणच सर्व करून मी खूपच चपळ बनले होते. लेखी परीक्षेत ९० च्या पुढे मार्क पाहून इतके छान वाटायचे ना!

Hi Jennifer, how are you ? I am good ! how about you ? I am fine. जेनिफर तिच्या धोपटीतून जाडे पुस्तक बाहेर काढते आणि मला विचारते, धड्यातले कोणते पान चालू आहे ? ते पान मी तिला दाखवताच. आम्ही दोघी एकमेकींकडे बघत स्मितहास्य करतो. मी तिला हळू आवाजात विचारते की या टॉपिकवरची परीक्षा येत्या शुक्रवारीच आहे ना ? ती म्हणते yes ! करीन यांचे रोलकॉल घेणे संपते आणि एक बाई विचारते की मला डी. सी.ला जायचे आहे. परीक्षा नंतर ठेवाल का ? करीन म्हणतात ‘‘ No !" you can give exam on monday !१०० पानांच्या धड्यावर परीक्षा आणि नंतर एक भलामोठा गृहपाठ एकत्रच आले होते. करीन यांनी परीक्षा पुढे ढकलली नाही तेच बरे झाले कारण की अभ्यास चुकत नाहीच. शिवाय परीक्षा पुढे ढकल्याने फायदा होत नाही कारण त्याच्या पुढची परीक्षा

लागलेलीच असते. तो गृहपाठ खूपच मोठा होता. पाने प्रिंट करून मोठा गठ्ठा तयार झाला होता की जो मोठ्या स्टेपलरनेही स्टेपल करता येत नव्हता. म्हणून मी एका मोठ्या एनव्हलप मध्ये तो गठ्ठा घातला आणि गृहपाठ दिला.

गृहपाठ असा होता की ती व तो प्रेमात पडतात आणि लग्न करतात. त्यांना मुले होतात. एक मुलगा आणि एक मुलगी. मुलगी अज्ञान आणि मुलगा सज्ञान. तिला एक पुरूष आवडायला लागतो आणि ते दोघे एकमेकांच्या प्रेमात पडतात आणि त्यांचे प्रेम प्रकरण चालू होते. आपल्या बायकोचे कुणाबरोबर प्रेम प्रकरण चालू आहे हे कळल्यावर तो खूप चिडतो. त्यांच्यात बरेच वादविवाद चालू होतात. ते इतके विकोपाला जातात की नवरा दारू पिऊन बायकोला मारायला लागतो. ती तुमच्या ऑफीसमध्ये येते आणि तिची सर्व स्टोरी सांगते आणि आता काय करावे याचा सल्ला तुम्हाला विचारते. या गृहपाठामध्ये करीन यांनी सर्व प्रकारच्या कागदपत्रांचे ड्राफ्टिंग सांगितले होते. शिवाय कोर्टातले सर्व फॉर्म डाऊनलोड करून ते भरायला सांगितेले होते. गुगलींग तर करावे लागतेच. गुगलमध्ये सर्वकाही मिळते. नशिबाने दुसऱ्या विषयाचा गृहपाठ व परीक्षा नव्हती !

करीन यांचा वर्ग संपल्यावर मी जेनिफरला म्हणाले See you tomorrow ! फॉल सेमेस्टरला जेनिफर व माझी ओळख झाली. Clarke बाईनी जेव्हा पहिल्यांदा रोलकॉल घेतला तेव्हा माझे नाव पुकारल्यावर पुढे बसलेल्या जेनिफरने मागे वळून माझ्याकडे पाहिले व हासली. मीही हासले. दुसऱ्या दिवशी पासून पूर्ण सेमेस्टर होईपर्यंत ती माझ्या शेजारीच बसायची. स्प्रिंग सेमेस्टरला सुध्दा ती माझ्या शेजारीच बसायची. मला खूप छान वाटायचे.

जेनिफर रॅलीला तिच्या आईवडिलांसोबत तिथे रहायची. शिक्षणासाठी म्हणून आणि तिच्या होणाऱ्या नवऱ्यासोबत विल्मिंग्टनला रहात होती. तिने तिच्या साखर पुड्याची अंगठी मला दाखवली आणि म्हणाली येत्या ऑक्टोबरला

आम्ही दोघेही विवाहबध्द होत आहोत. एकदा असे झाले की एका टेस्टमध्ये True or False मध्ये एक वाक्य बरोबर होते ते करीन यांनी चूक दिले होते. पेपर मिळाल्यावर आम्ही दोघीं एकमेकींच्या पेपरामध्ये डोकावले आणि बोललो ते वाक्य बरोबर आहे .चूक कसे काय ? जेनिफर म्हणाली आज मी पुस्तक आणले नाहीये तर तू विचार करीन सरांना.

मी हात वर केला आणि सांगितले की हे वाक्य बरोबर आहे. करीन आमच्या टेबलापाशी आले. त्यांनी ते वाक्य वाचले आणि म्हणाले की चूकच आहे. मी पुस्तकामधला पॅरा त्यांना दाखवला तरीही ते चूक म्हणाले. आम्ही दोघी कसे काय शक्य आहे ?अश्या प्रश्नार्थक नजरेने एकमेकींकडे पाहिले. मग मी करीन यांना ते वाक्य कसे बरोबर आहे याचे थोडे स्पष्टीकरण दिले. पुढच्या बाकावरची बाई म्हणाली what she says is correct . मग करीन यांना ते पटले असावे आणि म्हणाले ओके ! आणि त्यांनी आम्हाला दोघींनाही त्या प्रश्नाचे मार्क देवू केले! माझा शिक्षणातला आत्मविश्वास खूप वाढला होता. २ सेमेस्टर मध्ये एकेक विषय घेऊन त्या सेमेस्टर चांगल्या रितीने पार पडल्या होत्या. बाकीचे विषय कोणकोणते घ्यायचे आणि त्या विषयाला कोणकोणते शिक्षक आहेत ते आपल्याला आधीच माहिती पडते. त्यामुळे मी पुढच्या सेमेस्टरला विषय निवडणार होते. समर सीझनमध्ये मी इंडिया ट्रीप करणार होते त्यामुळे त्या सेमेस्टरला मी ब्रेक घ्यायचे ठरवले. एका सेमेस्टरला २ विषय घेतले असते तर थोडा उशीराने का होईना माझा डिप्लोमा कोर्स पूर्ण झाला असता. डिप्लोमा कोर्स पूर्ण केल्यावर मला लॉ फर्ममध्ये नोकरी मिळाली असती. या कोर्समध्ये वकीली करता येत नाही पण वकीलाला मदतनीस म्हणून नोकरी करता येते. पण शिक्षणात अडथळा येणार हे मला कुठे माहिती होते? विनायकच्या दुसऱ्या नोकरीच्या निमित्ताने आम्ही विल्मिंग्टन सोडून दुसऱ्या शहरात राहायला गेलो.

--------✽--------

# १५) आयरीन

आयरीन नावाचे वादळ येणार आहे, म्हणता म्हणता येऊन थडकले की! हवामानाचा अंदाज सारखे सारखे वर्तविणारे दोन चॅनल्स पाहत होतो, एक म्हणजे १४ न्युज डॉट कॉम आणि वेदर डॉट कॉम. वादळाचा गोल गोल फिरणारा गोळा हळूहळू पुढे सरकत होता. साऊथ कॅरोलायनातून सरळ रेषेत cape hatteras, nc वर हे वादळ सरळ सरळ येऊन आदळणार होते. Wilmington शहरात घुसणार नव्हते तरी खूप जवळून जाणार होते हे माहित होते पण तरीही.... त्याने अचानक दिशा बदलली तर ...?? म्हणजे थोडे जरी डावीकडे सरकले तर थेट आमच्याकडेच की! बातम्या त्याच त्याच असल्या तरी बघितल्या जात होत्या. एक दोन वर्षापूर्वी एक वादळ थेट आमच्या शहरात घुसणार होते, ते सुद्धा मध्यरात्री! म्हणून आम्ही जागे होतो, ऐनवेळी त्याने दिशा बदलली आणि ते दुसरीकडे निघून गेले! माझा तर मूडच गेला. या Wilmington शहरात ना कधीही काहीही होत नाही! अति वृष्टी नाही, हिमवृष्टी तर नाहीच नाही, पण गेल्यावर्षी ती अनुभवाला आली आणि त्याचा आनंद लुटला. अर्थात कोणतेही तीव्र हवामान नाही ! हे चांगलेच, नाही का ?

आमच्या शहराच्या जवळून जाण्याचा वादळाचा दिवस व त्याच्या आदल्या दिवशीचे हवामानाचे वेळापत्रक सारखे बघून बघून तोंडपाठ झाले होते. चक्रासारखे फिरणारे गोल गोल व त्यामध्ये हिरवे पिवळे लाल पट्टे (वादळाची तीव्रता दर्शवणारे) सरकत सरकत नक्की वादळ कुठे पोहोचले आहे हे समजत होते. काय काळजी घ्या, काय करा, काय नको हे पण वारंवार सांगत होते.

शनिवारी पहाटे वादळ येणार तर शुक्रवार सकाळपासूनच आकाशात ढग जमले होते, वारा वाहत होता, पाऊस पडत होता. अधुनमधून सर्वजण थांबतही होते. शुक्रवार सकाळी फुकटची कामे बाजूला सारून महत्त्वाची कामे उरकायला घेतली. कॅमेराची बॅटरी संपली होती ती चार्जिंगला लावली,

वादळाचे फोटो काढण्याकरता! होते नव्हते ते कपडे धुवायला वॉशिंग मशीन सुरू केले. दुपारचा स्वयंपाक केला, त्यात भाजी जास्तीची करून ठेवली.

वरणभाताचा कूकर लावला. परत थोड्या बातम्या बघितल्या. नेटवर इकडे तिकडे चकरा मारल्या. पाऊस व वारा वाढत होता. बातम्या बघून बघून डोके दुखायला लागले होते. सर्व काही टर्न ऑफ करून झोपले. ४ वाजता उठल्यावर फेसबुक पाहिले तर अवनीचा निरोप, अगं बातम्यांमध्ये Wilmington red alert दाखवत आहे, काळजी घे गं !... अरेच्या, बघते गं परत बातम्या म्हणून परत बातम्या सुरू केल्या. वादळाचे गोल Wilmington च्या जवळ येत चालले होते. जास्तीचा स्वयंपाक करायचा कंटाळा आला होता आणि उत्साह पण नव्हता. बातम्या बंद करून मेघनाशी फोनवर बोलले व परत एकदा कामाला लागले. पिण्याचे पाणी होतेच, फळेही होतीच, फक्त ब्रेड व थोडे अजून जास्तीचे पिण्याचे पाणी आणून ठेवावे का? असे ठरवून गेलो तर दुकान बंद! अर्थात अडत काहीच नव्हते.

संध्याकाळी खायला भाजणीचे थालिपीठ केले होते त्यात अजून एक दोन थालिपीठे जास्तीची लावली. रात्री आमटी व पोळ्या केल्या. आमटी जरा जास्त उकळली. पाऊस व वारा वाढत होता. लाईट गेले तर टेबलावर काडेपेटी व मेणबत्ती काढून ठेवली होती. मेणबत्ती जाड व बुटकी म्हणजे ती सहज बसते कोणत्याही बेसवर. परत एकदा बातम्या बघून झोपलो. यावेळी मात्र गोल गोल चक्रातले हिरवे, पिवळे व लाल पट्टे Wilmington शहर ओलांडून जात आहे असे दिसले. चला झोपा आता! आले वादळ! तयारी तर सर्व करून ठेवली आहे. झोपले तर खिडकीच्या बाहेरून घों घों असा आवाज, मधून पावसाचा आवाज. झोपायचे होते पण काही केल्या झोप येईना! एक दोन वेळा नेटवर चक्कर मारून परत पीसी टर्न ऑफ केला. मध्यरात्री नंतर साधारण २ ते ३ च्या सुमारास वाऱ्याचा गोंगाट खूपच वाढला. बाहेरची झाडे जोरजोरात हलत होती. खिडकीच्या काचेतून दिसतही होते. जाणवत होते वादळ अगदी जवळ आले

आहे ते! प्रचंड प्रमाणात गरम होत होते! छातीवर दडपण आल्यासारखे वाटत होते. पीसी ऑन केला तर मैत्रिणीचा फेसबुक वर निरोप, काय गं वारापासून कसा आहे? तिला सांगितले, हो गं बराच वाढलाय! असा निरोप लिहिला आणि बाहेर एकदम काळाकुट्ट अंधार दिसला. लगेच कळाले की लाईट जाण्याच्या मार्गावर आहेत. पीसी बिघडायला नको म्हणून लगेच टर्न ऑफ केला आणि काही क्षणातच पूर्ण लाईट गेले.

काळाकुट्ट अंधार! वाऱ्याचा घों घों असा आवाज. काचेतून बघावे तरी काळाकुट्ट अंधार! खिडकीबाहेरचे झाड खूप खाली वाकत होते, परत वर येत होते. वाऱ्याने त्या झाडाला खूपच सतावून सोडले होते. आता थोड्याफार विजाही चमकत होत्या. ओट्यावर व बाथरूम मध्ये मेणबत्या लावून ठेवल्या. स्वयंपाकघरात आले तर तिथे पाणीच पाणी झाले होते. साधारण पाऊल भिजेल इतपत पाणी बंद दारातून शिरले होते. दारावरही कोणीतरी थडथड आवाज करत आहे हे जाणवत होते. खूप नाही तरी किंचित रडकुंडीला आल्यासारखे झाले. जोपर्यंत लाईट आहेत तोपर्यंत काही जाणवत नाही पण एकदा का लाईट गेले की सर्वकाही ठप्प!!! सर्व जगाशी संपर्क तुटतो आणि एकटेपणाची भावना वाढते. हा एकटेपणा दोन तीन तासच टिकला. जशी सकाळ झाली तसा सूर्य वर आला आणि पूर्ण ढगाळलेल्या आकाशातून सुद्धा सर्व काही दिसायला लागले. हॉलमध्ये येऊन पडदा बाजूला सारला. पाउस व वारा यांचा खेळ चालूच होता. दार अगदी थोडे उघडून पाहिले तर वाऱ्याचा प्रचंड जोर! इतका की बाहेरचा वारा आत येऊन तुम्हाला तुमच्याच घरात उताणे पाडेल इतका! जोर करून परत दार लावून घेतले. फडक्याने घरात आलेले थोडे पाणी पुसून घेतले व फडके पिळून टाकले. कॉटवर आडवे पडण्याशिवाय काहीही करता येत नव्हते. उठल्या उठल्या चहा लागतो. गरम चहा नाही ! मग थोडीशी साखर खाल्ली. परत आडवे पडलो, डोळे मिटून शांत! आठ नऊ वाजता भूक लागल्यावर थोडी बिस्कीटे व सफरचंद खाल्ले. लाईट नाही तर चहा नाही, अंघोळ नाही. विनायक पुस्तक वाचत होता. मी तशीच कॉटवर आडवी पडून राहिले. रात्रभराच्या जागरणाने

थोडीफार गुंगी  येत होती. परत उठून काचेतून वाऱ्याला आणि पावसाला बघत होते. १ वाजता जेवणे केली व परत दार उघडले. वारे होतेच पण जोर बराच कमी झाला होता.

जाकिट घालून व ब्रेड घेऊन खाली तळ्यावर एक चक्कर मारून आले. वारा बऱ्यापैकी जोराचा होता! काही बदके आली ब्रेड खायला. काही तळ्याच्या दुसऱ्या काठावर बसली होती. बदकांचे पाय चालताना सरकत होते, पंख उडत होते.लाईटची वाट पाहता पाहता शेवटी संध्याकाळी ६ ला लाईट आले आणि अगदी जीव आल्यासारखा वाटला. पहिल्याप्रथम चहा करून घेतला. फेसबुकवर अपडेट लिहिले. माझी कॅनडात राहणारी मैत्रिण मोनिका हिचा फेसबुकवर निरोप आला होता की ताई मी तुला फोन करत होते पण फोन लागला नाही. सर्व काही ठीक आहे ना? तिलाही उत्तर पाठवले. अंघोळी उरकल्या. बाहेर चक्कर मारायला गेलो. बरेच ठिकाणी पाणी साचून राहिले होते. जिकडे तिकडे रस्यावर झाडाची बरीच पाने व फांद्याही पडल्या होत्या. आमच्या कारला पण बरीच झाडाची पाने चिकटली होती. कारमधून वालमार्टला जाऊन आलो. बंदकांसाठी ब्रेड घेतला व घरी आलो. रस्ते रिकामे होते. वादळवाऱ्याच्या खाणाखुणा दिसत होत्या पण जास्त नाही. संध्याकाळी वारापाऊस दोघेही थांबले होते. वाऱ्याच्या आवाजाने डोके भणभणायला लागले होते. संध्याकाळी बरीच शांतता होती. तळे तुडुंब भरून वाहत होते. बदकांना ब्रेड घालण्यासाठी तळ्यावर गेले तर नेहमीप्रमाणेच टणाटण उड्या मारत बदके व त्यांची पिल्ले ब्रेड खायला आली. त्यांना मनसोक्त ब्रेड खायला घातला. आकाशही सुंदर दिसत होते. काळ्यानिळ्या ढगांमध्ये बरेच रंगही विखुरले होते. आकाशातील रंगाचे प्रतिबिंब पाण्यावर उमटले होते. आज तळ्यातले पाणी मोरपंखी रंगाचे दिसत होते! रात्री ९ वाजता जेवणे केली व झोपलो ते सकाळी ६- ७ जाग आली. अतिशय शांत सुंदर झोप लागली. सकाळी उठून दार उघडले तर स्वच्छ सुंदर सकाळ उगवली होती!!!!

--------*--------

# १६) हँगिंग रॉक

वळणावळणाचा रस्ता पार करत आमची कार पार्कच्या दिशेने चालली होती. आजुबाजूला डोंगराळ प्रदेश होता. वसंत ऋतू चालू झाला तरी खूप हिरवेगार झाले नव्हते. उंचउंच झाडे. झाडांना पानेही तुरळकच दिसत होती. काटक्या व सुकलेला पालापाचोळा सर्वत्र दिसत होता. रस्ता काळा कुळकुळीत. रस्त्याचे दोन भाग पाडणारी मधली पिवळी रेषा व कडेच्या दोन पांढऱ्या रेषा स्पष्टपणे दिसत होत्या. आपण उंचउंच जात आहोत हे जाणवत होते. पार्क मध्ये कार पार्क केली. तिथल्या ऑफीसमध्ये जाऊन एक छोटे माहितीपत्रक घेतले ज्यामध्ये पार्कमध्ये असणाऱ्या सर्व ट्रेल्सची माहिती होती. आमच्या प्रवासाला पाच तास पूर्ण झाले होते. ४ तास हायवेवरचा प्रवास पार करून उरलेला तासाभरचा प्रवास केला आणि पार्कमध्ये हजर झालो. ऐन जेवणाच्या वेळेला पोहोचलो होतो त्यामुळे प्रचंड भूक लागली होती. कारमध्ये बसूनच जेवण केले. सर्वजण असेच करत होते कारण की पार्कमध्ये खाण्यापिण्याची सोय अजिबात नव्हती. पाणी पिण्याची बाटली, माहितीपत्रक, थोडी फळे व कुकीज घेऊन निघालो.

माहितीपत्रक वाचून सुरवातीला दोनतीन छोटे ट्रेल करायचे ठरवले. हे ट्रेल धबधब्याचे होते. एक उजव्या बाजूला व एक डाव्या बाजुला असे दोन धबधबे पाहिले. एक होता हिडनफॉल व दुसरा होता विंडोफॉल. हिडनफॉलला बरेच खाली उतरावे लागले. निसर्गनिर्मित छोट्या दगडांच्या पायऱ्या होत्या. खडकांवरून कोसळणारा छोटा धबधबा. त्याचे पाणी पायऱ्या पायऱ्यांवरून खाली येत होते. पुढे कुठेतरी आणखी दरीत जात असेल. तिथे छोटी मुले पाण्यात उभी होती. काही मुले तर खडकावर चढून धबधब्याच्या पाठीमागून येऊन दुसरीकडच्या खडकांवरून खाली उतरत होती. मला पण पाण्यात उभे

राहण्याचा मोह होत होता. दुसरा धबधबा जो होता तो होता विंडोफॉल. याकरता आधीही खूप चालावे लागले. चालताना खालची दरी दिसत होती. या धबधब्यासाठी १०० फूट खाली उतरावे लागले. इथेही निसर्गनिर्मित दगडांच्या छोट्या पायऱ्या व डावीकडे भरपूर सुकलेला पालापाचोळा व काटक्या, सुकलेली उंच झाडे. हा धबधबा आधी कठड्यावरून पाहिला. नंतर अजून थोडे खाली गेलो. धबधब्याचे नितळ पाणी खूप खालपर्यंत जाताना दिसत होते. इथे पण मुले बागडत होती. इथून वरती येताना मात्र अरे देवा! असे म्हणण्याची पाळी आली. लगेच्यालगेच पायऱ्या असल्या की उतरताना काही वाटत नाही पण चढताना मात्र जीव जातो. मी तर दर दोनतीन पायऱ्या चढल्या की दम खायला बसत होते. हृदयाचे ठोके नुसते वाढले नाहीत तर घौडदौड करत होते. त्या दिवशी मुहूर्तपण नेमका साधला गेला होता. डोक्यावर रणरणते उन होते.प्रचंड प्रमाणात सूर्यप्रकाश होता जणूकाही टिपूर चांदणेच! या दोन धबधब्यांनी खूपच दमवले. बरेच पुढे चालत गेल्यावर एक लाकडी शेड होती तिथे बाकड्यावर बसलो. थोडा गारवा जाणवला. तिथल्या थंडगार पाण्याने हात पाय तोंड धुतले.थोडी फळे, चॉकलेट व कूकीज खाल्यामुळे उत्साह आला.

आता तिसरा धबधबा पाहण्यासाठी परत चालायला सुरवात केली. वरचे दोनही धबधबे जातायेता मिळून ३ मैल चालणे, उतरणे, चढणे झाले होते. तिसरा धबधबा जाऊन येऊन १ मैलाचा होता. इथे डोंगराळ भागावरून बरेच खाली चालत गेलो. हा धबधबा मला प्रचंड आवडला. इथे धबधब्याच्या अगदी जवळ बसता येत होते.धबधब्याच्या बाजूच्या खडकांवर सहज बसता येत होते. मी खडकावर बसून धबधब्यामध्ये पाय सोडले. पाणी बर्फासारखे थंडगार होते. दुखणाऱ्या पायांना हे थंडगार पाणी आराम देत होते.असे वाटत होते की इथे च बसून राहावे. वेळेचा अंदाज घेतला आणि तिथून निघण्याचा निर्णय घेतला कारण की हॉटेलमध्ये जाऊन पडायचे होते. हॉटेल पार्क पासून तासाभराच्या अंतरावर वेगळ्या दिशेला होते. वळणावळण्याच्या रस्त्यावरून

हॉटेलच्या दिशेला मार्गस्थ झालो. मान डोके आणि पाय प्रचंड प्रमाणात दुखत होते. चढण्याची काय तर चालण्याची सवयही पूर्णपणे गेली आहे. पूर्वी शाळा कॉलेजात असताना पर्वती, हनुमान टेकडी, चतुर्श्रुंगी असे चढउतार बरेच वेळा केले होते. अमेरिकेत पहिल्यांदाच डोंगरमाथ्यावरचे चढउतार करत होतो.

दुसऱ्या दिवशी परत पार्कमध्ये हजर. पहिल्या दिवसापेक्षा दुसऱ्या दिवशी तापमान थोडे खाली होते आणि तुरळक ढगही दिसत होते. सर्वात मुख्य आणि आकर्षक ट्रेल म्हणजे हँगिंग रॉकट्रेल. हा जर केला नाहीतर इथे येण्यात अर्थच नाही. परत पाणी पिण्याची बाटली, फळे घेऊन निघालो. हा ट्रेल अतिशय निसर्गरम्य आणि छान ट्रेल आहे. सुरवातीला थोडा उतार उतरल्यावर चढायला सुरवात केली. पायवाटेवर पांढरी माती व त्यावर खडी परसलेली होती. आजुबाजूला उंचउंच झाडीच झाडी, पण फांद्या नाहीत. सर्वत्र काटक्या. झाडांच्या खाली सुकलेला पालापाचोळा. अगदी तुरळक ठिकाणी हिरवीगार पाने. अधूनमधून झाडे पडलेली होती. काही झाडांची खोडे अर्धी कापलेली तर अर्धी अशीच उघड्यावर पडली होती. डोंगर चढायला सुरवात केली. पहिला चढ गेला, दुसराही गेला, तिसरा पार केला. तिसऱ्या चढावर तर पाऊले उभी पडायला लागली. प्रत्येक चढावर एक लाकडी बाकडे होते दम खाण्या करता बसायला. कोरड्या झालेल्या घशात बरे वाटेल इतपत पाणी पीत होतो. चढ चढताना इतके काही दमायला झाले होते की तोंडातून एक शब्दही फूटत नव्हता.मनात गाणे मात्र गुणगुणत होते, परबतोंके पेडोंपर श्यामका बसेरा है...

डोंगराच्या माथ्यावर आलो आणि सपाट पायवाट सुरू झाली. यातही थोडा उंच सखलपणा होता पण खूप नाही. इथे मला थोडा कंठ फुटला. विनायकला विचारले अजून किती चालायचे आहेरे! विनायक म्हणाला अर्धे अंतर झाले अजून अर्धेतरी नक्कीच असेल, बघूया पुढे! पुढे बरेच चालत गेलो आणि परत थोडा चढ लागला. थोडया वेळाने लाकडाच्या पायऱ्या चढत वर

गेलो आणि समोर पाहतो तो काय ! २०० फूट उंच टोकदार सुळका ! इथे खालच्या खडकांवर काही तरूण मुले बसली होती. वर सुळक्याकडे पाहिले तर दोघे जण तिथे उभी होती. ते बघूनच पोटात धस्स झाले! आम्हाला वाटले संपला आता ट्रेल तर संपला कुठचा! उजव्या दिशेने जा असा एक बाण दिसला. तिकडून माणसे येताना दिसत होती. त्यातला एकजण मजेने म्हणाला ती दोघे वर खोळंबली आहेत. खालून एलेव्हेटर पाठवा म्हणजे त्यांना खाली येता येईल .इथे सुळक्याचे फोटो काढले. फोटो काढण्यात माझी टोपी तिथेच पडली. इथुनही थोडासा उतार आणि परत चढणचचढण .ही चढण परत निसर्गनिर्मित छोट्या खडकांच्या पायऱ्यांची होती. हा जो चढ आहे तो डोंगरामागून वळसा घालून खूद्द हँगिंगरॉक कडे नेऊन पोहोचवतो. इथे बरेच मोठाले खडक होते. निरनिराळ्या खडकांवर उभे राहून खालची खोल दरी दिसत होती. भीतीच वाटत होती. अजूनही थोडे पुढे गेल्यावर मोठमोठाले ओबडधोबड निरनिराळ्या आकाराचे खडक होते. खडकांची टोके निमुळती होत वेगवेगळ्या दिशेला पुढे गेली होती. इथे उभे राहून सर्वांचे फोटोज काढणे सुरू होते.

काहीजण पुढे गेलेल्या खडकाच्या अणकुचीदार टोकावर जाऊन बागेत बसल्यासारखे आरामात बसले होते. काहीजण खाली पाय सोडून खुर्चीत बसल्या सारखे बसले होते. इथेही लहान मुले, छोटी बाळे होती. मी पण खडकावर उभे राहूनच खोल दरीचे फोटो काढले, पण अगदी टोकाला जाऊन उभे राहण्याची किंवा बसण्याची हिम्मत कदापिही होणे शक्य नाही, कारण की खाली पहिले तर खोल दरी!! सुळका २०० फूट व डोंगरावरचे चढ मिळून साधारण अंदाजे ३०० ते ४०० फूट अंतर पार करून वर गेलो होतो. तिथे जाऊन खालच्या दरीतला नयनरम्य परीसर बघितला. दूरवर परसलेले डोंगर बघितले. डोंगरातून येणारी आमची पायवाट बघितली. वर येताना त्रास होता, आता काय खाली उतरायला खूप सोपे आहे असे वाटले. खाली उतरायला

सुरवात केली. सुळक्याच्या पायथ्याची येऊन परत एकदा सुळक्याच्या टोकापर्यंत नजर टाकली. तिथे माझी पडलेली टोपी मिळाली. वेळेवर मिळाली, कारण उन चढायला सुरवात झाली होती .कोणीतरी छोट्या झाडाच्या अर्धवर कापलेल्या खोडावर टांगून ठेवली होती. उतरताना खूप छान वाटत होते. मनात गाणे गुणगुणत होते, घडीघडी मोरा दिल धडके..... मधुमतीतले चित्रीकरण असेच आहे.डोंगराच्या माथ्यावर सपाट पायवाट. उंच उंच झाडे, खाली उतरलेली खोल दरी.उतारावर आपोआप भरभर उतरले जात होते.पायांना रोखण्यासाठी खूप कष्ट पडत होते.थोडी फळे खाल्ली. गार पाण्याने हातपाय तोंड धुतले. थंडगार पाणी प्यायले. विचार केला होता इतके लांब आलोत तर उद्याही एक दोन ट्रेल करावेत का पण मनाला आवर घातला आणि सूर्यास्त होण्या आधी घरी येउन पोहचलो .निघताना वळणा वळणाची वाट संपल्यावर एका मेक्सीकन उपाहारगृहात जेवण केले. जेवणाची चव चांगली होती त्यामुळे पुढच्या प्रवासासाठी उत्साह आला. घरी आल्यावर फोटोज पीसीवर अपलोड केले .आगळा वेगळा अनुभव घेतल्याचा एक प्रचंड उसाह मनात साठून राहिला होता. ! डोळे मिटले की सारखा हँगिंगरॉक डोळ्यासमोर येत होता .!



# १७) ब्रायसन सिटी ते गॅटलीनबर्ग

नॉर्थ कॅरोलायना राज्यातील सर्व ठिकाणे पालथी घातली असल्याने उरले होते फक्त गॅटलीनबर्ग आणि ते ही माझ्यामुळेच. मला डोंगर दऱ्यातून प्रवास करताना भीती वाटते पण आता पर्याय उरला नव्हता. गुगलींग करताना ब्रायसन शहरात एक आगगाडीचे आकर्षण आहे ते म्हणजे डोंगरदऱ्यातूनही आगगाडी नागमोडी वळणे घेत जाते ती नान्थाहाळा नदीपाशी विश्रांती घेऊन शहरात परत येते.गुगल शोध घेता  घेता ब्रायसन शहरापासून गॅटलिनबर्ग तासाभराच्या अंतरावर आहे ते कळाले त्यामुळे विनायक म्हणाला इतके जवळ जात आहोत तर गॅटलीनबर्ग ही पाहू.माझे लगेच नकाशा बघणे, रस्ते कसे आहेत हे बघणे सुरू झाले.खरेतर रस्ता खतरनाक होता.नॉर्थ कॅरोलायना ब्रायसन शहरातून निघून मधल्या सर्व डोंगरदऱ्यांना छेद देणारा रस्ता ओलांडून टेनिसी राज्याच्या सीमारेषा ओलांडल्यावर गॅटलीनबर्ग मध्ये प्रवेश करणारा होता. मी तयार झाले कारण की रस्ता जरी खतरनाक असला तरी दिवसाउजेडी जाऊन पोहोचणार होतो आणि अवधी तासाभराचाच होता. तरीही माझ्या मनात भीती होतीच.

हॉटेलबुकींग, थोडे खाण्याचे पदार्थ व एक वेळची पोळी भाजी आणि बाकीची  जय्यत तयारी घेऊन thanks giving festival च्या दुसऱ्या दिवशी सकाळी ९ वाजता निघालो. यावेळी पोळीभाजी मध्ये वाटेत न खाता ती हॉटेलमध्ये खाण्याचे ठरवले. मधल्या वाटेत जेवणाच्या वेळी मेक्सीकन फूड किंवा पिझ्झा खाऊ असे ठरवले होते. महामार्ग ४० वेस्टग्रीन्सबोरो पर्यंतचा रस्ता माहीती असला तरी पुढचा रस्ता नव्यानेच पाहणार होतो. ॲशविल शहराच्या  पुढे ७४ वेस्टचा फाटा घेऊन त्यावरून ब्रायसन शहरात पोहोचणार

होतो. ग्रीन्सबोरो नंतरचा रस्ता मात्र चांगलाच चढावरचा आणि डोंगराळ भागातला आहे. तीक्ष्ण नागमोडी रस्तेही नवीनच होते. ७४ वेस्ट रस्ताही तसा वळणावळणाचाच होता. वेस्टच्या दिशेने जात असल्याने सूर्य अगदी डोळ्यासमोर येत होता.अगदी टपून बसल्या सारखा  येत होता ते चांगलेच जाणवत होते. त्याच्या प्रखरतेमुळे पुढच्या रस्त्याचे वळणही नीट कळत नव्हते. आठ तासाच्या प्रवासात खूपच दमायला झाले होते. डोंगराळ भागाची सवय नसल्याने डोकेही भणभणायला लागले होते. जशी संध्याकाळ जवळ येत चालली तसा सूर्याचा त्रास कमी झाला आणि हॉटेलमध्ये पोहोचता पोहोचता रात्रीचा अंधार झाला. हॉटेलमध्ये बॅगा टाकल्या. हातपायतोंड धुतले आणि बाहेरच्या विभागात काही पेय आहे का ते बघायला आलो. तर तिथे चक्क चहा मिळाला. चहा प्यायल्यावर चढलेले डोकेही थोडे उतरले. थंडी खूप होती तरीही बाहेर चालत चक्कर मारायचे ठरवले व बाहेर पडलो. चालायला फूटपाथ होते. आजुबाजूला उंचउंच डोंगर दिसत होते. हॉटेल डोंगरावर होते त्यामुळे फुटपाथवरून खाली चालत जायला उतारच उतार होता. हवा थंड असली तरी कोरडी होती. अशी हवा आम्हाला दोघांना खूप आवडते . कदाचित आमच्या दोघांचे जन्म व शिक्षण पुण्यातच झाले असल्याने कोरडी हवा आम्हाला  मानवत असावी. चालताना खूप छान वाटत होते. एका चौकापाशी आल्यावर परत हॉटेलच्या रस्त्याकडे जायला मागे वळालो. आता चढणच चढण पण तरीही छान वाटत होते. मोकळी हवा शरीरात जात होती त्यामुळे उत्साह आला होता. हॉटेलमध्ये आल्यावर परत एकदा चहा घेतला. खरेतर गरमगरम इडलीसांबार खावेसे वाटत होते पण ही इडली खाण्याची भूक सकाळी करून घेतलेल्या पोळीभाजीवरच भागवली .इथे कुठचे इडली न डोसे! झोपताना उद्याच्या जेवणाची उपाहारगृहे नेटवर बघितली .सकाळी उठल्यावर गरमगरम शॉवरखाली अंग शेकल्यावर परत बरे वाटले .झोप नीट लागत नाहीच पण गादीवर ८ तास अंग टेकल्याने पाठीला  आराम  मिळतो. आम्हाला  इथल्या  हॉटेलमध्ये मिळणारा नाश्ता

अजिबातच आवडत नाही तरीही काहीतरी पोटात ढकलायचे म्हणूनच केवळ खातो. मला तर गोड अजिबात आवडत नाही त्यामुळे कमी खाल्ले जाते आणि नंतर भूकही लवकर लागते. उकडलेली अंडी व त्यावर मिरपूड व मीठ लावून खाल्ली त्यामुळे पोटाला थोडा आधार मिळाला. आगगाडीचा प्रवास जाऊनयेऊन ४–५ तासाचा होता. ११ ला निघालो ते संध्याकाळी ५ ते ६ दरम्यान परत ब्रायसन शहरात आलो. गाडी डकावडकावच चालली होती. तशीच ती जाणार होती त्यामुळेच तर आम्हाला आजुबाजूचा निसर्ग पाहता आला. आगगाडीत काहीही खायचे पदार्थ आणू नका असा नियम होता म्हणून काही फळे घेणार होतो तीही घेतली नाहीत. प्रवास छान झाला पण भुकेची पूर्णपणे वाट लागली! आगगाडीतले खाण्यापिण्याचे पदार्थ लवकर संपले. अर्थात ते आमच्या उपयोगाचे नव्हतेच पण जे काही थोडेफार होते तेही संपले होते. नान्थाहाळा नदीपाशी तासभर गाडी थांबते तिथे ही सर्व उपाहारगृहे मोठ्ठी सुट्टी असल्याने बंद होती. भुकेनी खूप हैराण झालो होतो. नाही म्हणायला प्रवास चांगला झाला होता.नान्थाहाळा नावाची नदी स्वच्छ, नितळ होती आणि उथळही होती.ती खूपच आवडून गेली.आगगाडीतून आजुबाजुला दिसणारी तळी आणि रस्ते छान दिसत होते. झाडे मात्र काटक्यांनीच भरली होती.काही तुरळक ठिकाणी हिरवीगार झाडे दिसत होती. त्या डोंगरामध्ये असणारी घरेही छान दिसत होती. सकाळी ९ वाजता जे काही थोडेफार खाल्ले होते त्यानंतर ८ ते ९ तासाने पिझ्झा खाण्यासाठी परत कारमध्ये बसलो. पिझ्झाहट जवळच होती. आदल्या दिवशीच खाण्याची ठिकाणे बघून ठेवल्याने पंचाईत झाली नाही.

पिझ्झा खाऊन थोडा बरोबरही घेतला आणि टेनिसीमधल्या गॅटलीनबर्ग कडे जायला कार वळवली. अंधार पडत चालला होता आणि त्यातून दऱ्याडोंगरामधला रस्ता होता. जिपिएसनेही साथ देण्याचे नाकारले. गुगलमॅप होता त्यावरून रस्तापार करत होतो. नॅशनलपार्कचा स्ता असल्याने रस्ता

खूपच छान होता. काळाकुळकुळीत आणि गुळगुळीतही! तुरळक का होईना वर्दळ दिसत होती म्हणूनच माझा जीव भांड्यात पडला. रस्त्यावरून जाताना थोडावेळ बाजूने नदी जात होती. त्याचा मंद खळखळाट ऐकू येत होता त्यामुळे सोबत असल्यासारखे वाटत होते. पुढे वळणावळणाचे रस्ते सुरू झाले. खूप अंधूक अंधूक का होईना पण दिसत होते आणि जाण्याचा अवधीही एक तासाचाच होता. मोठमोठाली झाडे, मोठाले कडे, कपाऱ्या अंधूक प्रकाशातही दिसत होते. खूप उंचउंच जात आहोत हे जाणवत होते आणि एके ठिकाणी खूप ठप्प अंधार झाला आणि दोन वेगळे रस्त दिसले. एक डावीकडे व एक उजवीकडे, नक्की कुठे जायचे ? उजवीकडे गेलो तर तिथे उंचावरून दरीतला देखावा बघण्याचा पॉईंट होता. बापरे ! खूपच उंच आलो आहोत आपण ! जवळजवळ ६००० फूट उंच. पण इथेतर दोन चार गाड्या थांबलेल्या दिसतात. नक्की कुठे जायचे ? असे म्हणत परत मुख्य रस्त्याला लागलो पण डावीकडे की उजवीकडे ? असा विचार करतो न करतो तितक्यात गॅटलीनबर्ग उजवीकडे आहे असा बाण दिसला आणि उजवीकडे वळालो. आता मात्र खरी कसरत होती. अरुंद रस्ते आणि इथे वळणेतर काटकोनात होती. लगेच्यालगेच होती.पुढे जातो न जातो तोच दुसरे काटकोनातले वळण. एका बाजूला उंच कडा दिसत होता. दुसरीकडे नक्कीच खोल दरी असणार. काळाकुट्ट अंधार! आणि पूर्णपणे उतार! मोठ्ठी सुट्टी असल्याने तुरळक का होईना वाहने दिसत होती म्हणजे अगदी नशिबानेच साथ दिल्यासारखी वाटत होती. एक सुद्धा वाहन दिसले नसते तर मात्र मला जामच भीती वाटली असती. आता फक्त पुढच्या रस्त्यावर नजर खिळवून पटापट रस्ता पार करणे हेच एक ध्येय होते. केव्हा येणार आता गॅटलीनबर्ग! वळणे तर अजून संपतच नाहीत ! असे मनातल्या मनात म्हणत होते. थोड्यावेळाने खूप लांब थोडे दिवे लुकलुकताना दिसले तेव्हा जरा धीर आला आणि लगेचच एक पाटीही दिसली. ती पाटी म्हणजे वेलकम टु गॅटलीनबर्ग. रस्ता तासभराचा असला तरी

३-४ तासाचा प्रवास केल्यासारखा शीण आला होता. हॉटेल सापडायलाही वेळ लागला पण तरीही डोळे सुखावत होते. आजुबाजूच्या फूटपाथवर माणसांचे लोंढेच्या लोंढे चालताना दिसत होते. एका पाठोपाठ एक कार असा भरगच्च ट्रॅफीक होता. सगळीकडे दुकानामधली रोषणाई झगमगत होती.

शेवटी एकदाचे हॉटेल दिसले. रूममध्ये सामान ठेवले. इथेही चहा होता. चहा प्यायला आणि गादीवर थोडेसे अंग टेकले. दिवसभराच्या उलट्यासुलट्या प्रवासाने खूपच दमायला झाले होते. पिझ्झा खाल्याने विशेष भूक नव्हती. गरम पाण्याने हातपायतोंड धुतले आणि बाहेर पडून चालायला सुरवात केली. जेव्हा गॅटलीनबर्ग मध्ये शिरलो होतो तेव्हाच एक मेक्सीकन उपाहारगृह बघितले होते. त्याचे नाव नेटवर टाकून शोध घेतला तर ते हॉटेलपासून लांब होते. विचार केला आणि फिरायलाच बाहेर पडलो आहोत तर येतायेता सहज सापडले आणि दिसले तर जेवूनच येऊ. फिरतफिरत फुटपाथवरच्या गर्दीत शिरलो आणि खूपच ताजेतवाने वाटले. रात्रभर त्या गर्दीतून चालतच बसावेसे वाटत होते. सर्व दुकाने उघडी होती. सगळीकडे झगमगाट होता. लहानमुले, म्हातारी कोतारी माणसे, तरूणतरूणी सर्वजण जणूकाही आपल्याच बापाचा रस्ता आहे अशी चालत होती. बिनधास्त रस्ता क्रॉस करत होती. वाहने मात्र गर्दीला घाबरून हळुहळू धावत होती. फूटपाथवर बसायला अंतराअंतरावर बाकडीही होती. पुण्यातल्या लक्ष्मीरोड वरून फिरल्यासारखेच वाटत होते एखाद्या दुकानात जावे, तिथे काय काय आहे ते बघावे आणि परत बाहेर पडावे असे करता करता ३ ते ४ तास चाललो. पाय दुखायला लागले. प्रचंड भूक लागली. जातानाच मेक्सीकन उपाहारगृह बघून ठेवले होते. परत येताना मेक्सीकन जेवण जेवलो व तिथून हॉटेलवर परतणार होतो पण परत मुख्य रस्त्याला मोर्चा वळवला व आईस्क्रीमच्या दुकानात शिरलो. फुटपाथवरच्या बाकड्यावर बसून आईस्क्रीम

खाल्ले आता मात्र जास्त थंडी वाजायला लागली आणि थोडे गार वारेही वाहायला लागले. दुसऱ्या दिवशी लगेच परतीचा प्रवास होता म्हणून लगेच हॉटलेवर परतलो. येताना १२ वाजून गेले होते. गर्दी पाहून खूप उत्साह संचारला होता. खूप चालण्याने ताजेतवाने वाटत होते. पाय मात्र प्रचंड दुखत होते. दुसऱ्या दिवशी रोप-वे पाहून निघणार होतो पण पार्किंगला जागा मिळणे अशक्य होते याची खात्री आदल्या दिवशीच्या गर्दीनेच दिली होती म्हणून सकाळचा हॉटेलमधला नाश्ता खाऊन १० च्या सुमारास परतीची वाट धरली. परतीचा प्रवासही निसर्गरम्य होता. झाडांच्या मात्र सगळीकडे काटक्याच दिसत होत्या. घरी जाताना पुढच्या फॉल सीझन मध्ये गॅटलीनबर्ग मध्ये येण्याचा विचार पक्का केला.



# १८) चिमनी रॉक

हवा स्वच्छ आणि सुंदर होती.शिवाय हवेत  अजिबातच आर्द्रता नव्हती आणि म्हणूनच लाँगविकेंड चा प्लॅन  बनवला. खरेतर आम्ही हँगिग रॉकला जाणार होतो. तिथे २ वेळा जाऊन आलो होतो पण आम्हाला हा रॉक इतका काही आवडला आहे की मेमोरिअल डेला वर्षातून एकदा हॅगिंग रॉकला जायचेच असे आम्ही ठरवून टाकले होते. मीच म्हणाले तिथे जायला नको म्हणजे मला पण तो रॉक आवडतोच पण तिथले सर्व फोटो घेऊन झाले आहेत आणि ट्रीपला जायचे आणि फोटो काढायचे नाहीत!  चिमनी रॉकला जायचे ठरवत होतो. अजून दुसरी ठिकाणेही बघत होतो. तसेतर नॉर्थ कॅरोलायना सर्व पालथा घातला आहे. अजून एकदोन ठिकाणे राहिली होती पण ती २ तासाच्या अंतरात आहेत, ती नंतर ही करता येतील म्हणून चिमनीरॉक ठरवला. सर्व हॉटेल्स पटापट बुक होत होती. शेवटी एक हॉटेल मिळाले आणि मी तयारीला लागले. नेहमीप्रमाणेच एकवेळचे जेवण  आम्ही बरोबर घेतोच. कोणत्या रस्त्याने जायचे हेही ठरवत होतो. ७४, ४० की ७४ वरून पुढे २० आणि २६ रस्त्याचा फाटा घ्यायचा ? शेवटी २०-२६ च्या फाट्यावरून जायचे ठरले. इथे विश्रांतीथांबे आहेत आणि रस्ते सरळसरळ आहेत. हल्ली जिपीएस बरोबर घेतोच कारण की हायवे सोडला की रस्त्यांची नावे पटकन दिसत नाही आणि चुकायला होतेच आणि मग भिरभिर फिरत राहून शोधणे मला अजिबात पसंत नाही. शिवाय मला जिपीएस अजून एका कारणासाठीही आवडते. त्यातली बाई ओरडून तुम्हाला रस्ता सांगत असते आणि तो दिसतही असतो. कुणीतरी आपल्याबरोबर आहे असे वाटते.

चिमनीरॉकच्या इथे येऊन थडकलो.तिकिटे घेतली आणि वळणावळणाच्या रस्त्याने थेट चिमनीरॉकच्या पायथ्याशी आलो.आता समोरच रॉक दिसतोय म्हणल्यावर चला इथेच आधी जाऊ, बाकीचे नंतर पाहू असे ठरवले.शनिवारी सकाळी ९ वाजता निघालो ते चिमनीरॉक गाठायला आम्हाला

४ वाजले.आधी गुगलींग करून माहीती वाचली होती.५०० पायऱ्या चढायच्या आहेत याची मनाची तयारी केली होती.चिमनीरॉक वर जाण्यासाठी लाकडी जिने बांधले आहेत. चढायला सुरवात केली आणि धापा टाकतटाकत वर वर जात होतो. तिथे चढत असलेल्या सर्वांनाच खूप धापा लागत होत्या. दम खायला सगळेच जण मधेमधे थांबत होते. कधी वर जाणार? असे म्हणून वर पाहिले तर आता अगदी थोडेच आहे. तो काय दिसतोय की वर ! अमेरिकेचा झेंडाही फडफडतोय. आता अगदी नकोसे होऊन गेले होते. पाठपाय आणि कंबर दुखायला लागली होती. मधेमधे थांबून कोक ढोसत होतो.आता फक्त एकच जिना बाकी होता. तिथे एक उपहारगृह दिसले. तिथे सगळी मंडळी आईस्क्रीम खाण्यात दंग होती. आम्हीपण आईस्क्रीम खाल्ले. ते खाल्यावर अगदी जीव आल्यासारखे वाटले! वर जाऊन तिथल्या खडकांवर बसलो. फोटोसेशन झाले. विनु म्हणला की अजून एक वर पॉईंट राहिला आहे तो करून जाऊ. मी म्हणाले नको आता. बास झाले. वर बघितले तर तो खूपच वर वाटत होता. पण इतके आल्यावर थोडक्या करता तिथे जायचे नाही हे पण पटत नव्हते.

आईस्क्रीम खाल्ल्याने ताजेतवाने वाटत होते. आणि आम्ही अजून वर चढायला सुरवात केली. हा चढ खूप कठीण होता. उंचउंच जात होता. अर्थात चढताना कोणत्याही प्रकारची भीती वाटत नव्हती. मी विनुला म्हणाले आपण उगीचच इथे आलो, वर कुणीच दिसत नाहीये. आपण जाऊ परत, पण तितक्यात वरून काही लोकांचे बोलण्याचे आवाज ऐकू आले आणि मला बरे वाटले. नंतर अजून एक फॅमिली येताना दिसली. वरून एक जोडपे खाली उतरत होते, त्यांनी आम्हाला सांगितले आता अगदी थोडे राहिले आहे. वर गेल्यावर तिथून खूप छान नजारा दिसतो. आम्हाला दोघांनाही वर चढून चढून खूपच दमायला झाले होते. माझी तर खूपच चिडचिड होत होती. शेवटी

एकदाचे पोहोचलो.इथून खोलवर पसरलेली दरी आणि त्यामध्ये उगवलेली हिरवी झाडी पाहून सुखावलो. चढताना अजिबात उन लागले नाही. वर गेल्यावर मात्र खुप उन होते.सावल्या स्पष्ट पडत होत्या.तिथल्या गाईडने आम्हाला सांगितले की मी ५ मिनिटांत पार्क बंद करतोय. फोटो काढायचे तर काढून घ्या. नंतर तोच आम्हाला म्हणाला की मी एक तुमच्या दोघांचा फोटो काढतो. या पॉईटला खूपच कमी माणसे येत होती. बरिच माणसे चिमनीरॉकच्या खडकावर हवा खात बसली होती. इथून बराच खाली रॉक आणि त्या खालची हिरवीगार झाडे दिसत होती. शिवाय लेक ल्युअर पण दिसत होता. थोडयाच वेळात आम्ही खाली उतरायला सुरवात केली.

उतरताना मात्र क्वचित एक दोन वेळाच दम खायला थांबलो . खाली उतरलो. कारमध्ये बसलो आणि थेट हॉटेल गाठले. प्रचंड भूक लागली होती. त्यात भर म्हणजे खूपच दमायला झाले होते. आधीचा ६ तासांचा प्रवास आणि नंतरचे ३ तास चढून आणि उतरून खूपच दमछाक झाली होती. हॉटेलवर बॅगा टाकल्या. तिथली कॉफी प्यायली आणि मेक्सिकन उपहारगृहाचा पत्ता जीपिएस वर टाकला. रस्ता बंद असल्याने तिथे जाता आले नाही म्हणून पीझ्झा खायला गेलो. परत हॉटेलवर आल्यावर मी म्हणाले की उद्या सकाळी घरी परतू. विनू पण म्हणाला तेच करू. मलाही खूप दमायला झाले आहे.

आम्ही साधारण ५०० ते ६०० फूट वर चढून गेलो होतो आणि जिन्याचा हिशेब केला तर अंदाजाने ५० मजले वर चढून गेलो होतो.इथूनही अंदाजे ३०० फूट वर चढून गेलो होतो आणि इथूनच खाली दिसणाऱ्या चिमणी रॉकचा फोटो काढला होता.पायात प्रचंड गोळे आले होते.पाठ आणि मानही खूप दुखत होती.दुसया दिवशी सकाळी उठलो तेव्हा तिथला एक प्रसिद्ध धबधबा पाहावा का असा विचार केला पण तिथे जाण्यासाठी मन आणि शरीर तयार होईना ! हा धबधबा पूर्वकिनापट्टीवरचा सर्वात उंचावरचा आहे. तिथे एक दोन फिल्मचे शूटींगही झाले आहे. युट्युबवर पाहिले होते.

मोह तर होत होता आणि इतके केले त्यात हेही करूच असे मनही सांगत होते पण शेवटी निर्णय परत घरी जाण्याचाच घेतला आणि तेच योग्य होते.या ट्रीपमध्ये चढण्याची आणि कारने प्रवास म्हणजे येऊनजाऊन १२ तास बसण्याची क्रिया झाली होती.चालणे अजिबात झाले नव्हते म्हणून मेमोरिअलडे, सुट्टीच्या दिवशी नदीवर चालायला गेलो तेव्हा कुठे थोडे पाय मोकळे झाले. चिमनीरॉकवरून आल्यापासून मनामध्ये हॅगिंग रॉकची व चिमनीरॉक यांची सारखी तुलना आम्ही करत होतो.

एक वेगळा अनुभव म्हणून चिमनीरॉक आम्हाला दोघांनाही आवडलाच यात वाद नाही, पण झुकते माप हँगिगरॉकलाच !!! खूप उंचावरून काढलेला चिमनीरॉकचा फोटो मी ली रिंगरला पाठवला व त्याने तो लगेचच वेदर.शॉट ऑफ द डे मध्ये दाखवला आणि नमूद केले की रोहिणी मेमोरिअलडेला तिकडे गेली होती आणि तिने मला हा फोटो पाठवला. मला खूप आनंद झाला होता. माझ्या युट्यूब चॅनलवर तुम्हाला ती क्लिप दिसेल.



# १९) समुद्रकिनाऱ्याकडून पर्वतरांगांकडे प्रस्थान

आमच्या नशिबची चक्रे इतकी वेगाने फिरली की निवांत बसायला वेळ नव्हता. एकापाठोपाठ एक घडत गेले. अपार्टमेंट शोधात मानसिक त्रास झाला. जे अपार्टमेंट उपलब्ध होते तेही खूप मागच्या इमारतीत. दुसऱ्या मजल्यावर आणि इमारतीच्या मागच्या बाजूला होते. तिथल्या बाल्कनीत उभे राहिले की फक्त झाडेच दिसायची. माणूसदर्शन नाही. शिवाय विनायक सकाळी जायचा ते संध्याकाळी यायचा. डबा  घेऊन जायचा. जाण्यायेण्यासाठी मिळून कारने त्याचे २ तास खर्ची पडत होते. अर्थात एक जमेची आणि चांगली बाजू होती ती म्हणजे सगळीकडे डोंगर. टुमदार गाव .डोंगरावरची झाडी आभाळाला टेकलेली. त्यामुळे तयार झालेली निसर्गाची रंगसंगती अप्रतीम! लोकवस्ती १५ ते २० हजारच्या दरम्यान. विनायकच्या नोकरीचे ठिकाण होते ब्रेव्हार्डमध्ये. ब्रेव्हार्ड पण अगदी छोटे . विनायकची कंपनी चोहोबाजूंनी वेढलेल्या डोंगराच्या कुशीत होती. कामावर जाण्यायेण्याचा रस्ता खूप निसर्गरम्य. रस्त्याच्या दुतर्फा अनेकविध झाडे व छोटी छोटी पठारे. हा जाण्यायेण्याचा रस्ता म्हणजे छोटासा घाटच जणू ।

जेव्हा विनायकला कंपनीत मुलाखतीकरता बोलावणे आले तेव्हा मी पण त्याच्यासोबत गेले होते. कंपनीने विनायक करता ब्रेव्हार्ड मध्ये हॉटेल बुक केले होते. तिथे पोहोचताना रात्र झाली होती. खूप उंचावर जाऊन पोहोचलो होतो. जाताना एक विश्रांती थांबा होता तिथला नजारा काही वेगळाच होता.विश्रांती थांब्याच्या आजूबाजूला अनेक झाडांमध्ये वारा सळसळत होता. काजवे चमकत होते. टिटवे किर्र किर्र असे आवाज करत होते. तेथून पुढचा रस्ता उंचावरचा तर होताच पण तीव्र चढण पण होती. शिवाय काटकोनातली थोडीफार वळणे पण होती. कारचा गिअर पहिल्यांदाच बदलावा लागला. नंतर परत थोडासा उतार लागल्यावर काळाकुट्ट अंधार. रस्त्यावर कोणीही  नव्हते.

हॉटेल मधल्या रूमचा ताबा घेतला आणि दुसऱ्या दिवशी आम्ही दोघे कंपनीत गेलो. कंपनीच्या आवारात मी एका बाकड्यावर बसले होते. आवाराच्या बाहेर खूप मोठे जंगल आणि त्यातले एक सफरचंदाचे झाड वाकलेले आणि त्याच्या फांद्या कंपनीच्या आवारात पसरलेल्या होत्या. बाकड्याच्या आजूबाजूला काही सफरचंदे पडली होती. मुलाखत झाल्यावर परतीच्या प्रवासात आम्हाल डोंगरावर उतरलेले ढग दिसले होते.

शहर टुमदार आणि निसर्गरम्य होते यात वादच नाही.त्याचा आनंद मला होताच पण मला काही गोष्टी करता येत नव्हत्या त्याचा त्रास होत होता. ली रिंगरला फोटो पाठवता येत नव्हते याचे कारण राज्य जरी एक असले तरी केबल चॅनल वेगळे होते. १४ न्यूज चॅनलला मी वेदर संदर्भात जे जे फोटो पाठवले आहेत त्यातले बरेच फोटोज हवामान तज्ञ ली रिंगरने Weather shot of the Day मध्ये दाखवलेले आहेत. दुसरे म्हणजे शिक्षण थांबवावे लागले याचेही वाईट वाटत होते. हेंडरसनविलमध्येही कम्युनिटी कॉलेज होते पण तिथे पॅरालीगल हा कोर्स नव्हता. विल्मिंग्टनमध्ये विनायकचे ऑफीस खूप जवळ होते त्यामुळे तो घरी जेवायला यायचा. इथे मात्र तसे नव्हते. सकाळी ८ ला विनायक निघायचा ते संध्याकाळी ७ ला घरी यायचा. मला खूप एकाकीपणा आला होता. नविन शहरात वेळ कसा घालवायचा हा माझ्यापुढे प्रश्न होता याचे कारण वेगवेगळ्या गोष्टी करण्याची मर्यादा संपून गेली होती. विविध लेखनाचे आणि पाककृती करण्याचे विषय संपून गेले होते. आम्हाला दोघांनाही चालायला आवडते. एके दिवशी विनायक एका फूटपाथवरून चालून आला. आणि मला सांगितले की तू पण चालून ये. हा फूटपाथ थेट इंगल्स ग्रोसरी स्टोअर पर्यंत जातो. हा फूटपाथ आमच्या अपार्टमेंटच्या आवाराला लागूनच होता. या फूटपाथवरून मीही चालायचे ठरवले. माझ्या चालीने या फूटपाथवरून जा ये करताना मला साधारण दीड तास लागायचा. एकाबाजूने वाहता रस्ता होता आणि दुसऱ्या बाजूने घरे , चर्चेस, पेट्रोल पंप,

डे केअर होते. रस्ता चढ उताराचा होता. या फूटपाथवरून चालताना मी प्रत्येक ऋतु अनुभवलेत. फूटपाथवरून चालून मी इंगल्स नावाच्या ग्रोसरी स्टोअर्समध्ये जात असे. तिथे स्टारबक्स मधली कॉफी पिऊन परत निघायचे. मी आठवड्यातून २ वेळा जायचे. मला फ्रेश वाटायला लागले. कंटाळा निघून गेला असला तरी पण व्यवधान नव्हते. सहज एकदा मी इंगल्स मध्ये एका बाईला विचारले की मला इथे नोकरी मिळू शकेल का ? ही बाई रॅक मध्ये ब्रेडचे गठ्ठे लावत होती. ती म्हणाली थांब, एक मिनिट. तिने इकडे तिकडे पाहिले आणि म्हणाली की तो तिकडे माणूस दिसतोय का तुला ? त्याला जाऊन भेट. पांढरा शर्ट आणि टाय लावलेला माणूस दुसरातिसरा कोणी नसून स्टोअर मॅनेजर होता. त्याला नोकरीबद्दल विचारले असता तो म्हणाला इंगल्सच्या वेबसाइट वर जाऊन अर्ज कर आणि मला येऊन भेट ! मी अगदी लगेचच अर्ज भरला. विभाग कोणताही चालेल असेही लिहिले. २ ते ३ वेळा चकरा मारायला लागल्या पण नोकरीचे काम झाले. कोणत्याही विभागात चालेल असे लिहिल्यामुळे मला नक्की कोणत्या विभागात टाकायचे हे ठरत नव्हते. शेवटी ग्रोसरी स्टोअर मध्ये असलेल्या डेली विभागात मला नोकरी लागली. ऑफीसला जाताना विनायक मला इंगल्स मध्ये सोडायचा व ४ वाजता मी फूटपाथ वरून चालत घरी यायचे. माझे नोकरीचे दिवस आठवड्यातून ४ दिवस होते. सोमवार ते शुक्रवार मधले २ दिवस आणि शनिवार - रविवार असे २ दिवस. या फुटपाथवरून मी प्रत्येक ऋतुमध्ये चालली आहे. वसंत ऋतुतली बहार अनुभवली आहे. वसंत ऋतुमधे चिमुकली फुले फुटपाथवरच्या बाजूला आणि पठारावरील हिरवळीवर खूप छान दिसायची. मला वाटायचे की जणू माझ्या स्वागतालाच उभी आहेत. ही फुले कितीतरी रंगांमध्ये होती. पांढरी शुभ्र , पिवळी धमक, तर काही जांभळ्या रंगाची. पानगळीमध्ये झाडांच्या पानांचे रंग बदलेले पाहिले आहेत. पानगळीच्या दिवसात तर चालायला खूप छान वाटायचे मला. फुले आणि पानगळीत पानांच्या बदलणाऱ्या विविध रंगामुळे माझी फोटोग्राफी परत सुरू झाली.

# २०) इंगल्स स्टोअर ( एका आगळ्यावेगळ्या नोकरीचा अनुभव )

वीसशे पंधरा सालच्या धनत्रयोदशीच्या दिवशी माझी नोकरी सुरू झाली. नोकरीच्या पहिल्या दिवशी जेमिने माझ्या अमेरिकन पासपोर्ट , सोशल सिक्युरिटी आणि स्टेट आयडी या कागदपत्रांच्या झेरॉक्स घेतल्या. काही कागदपत्रांवर माझ्या सह्या घेतल्या. ऑनलाईन काही माहिती भरली आणि माझी नोकरी सुरू झाली. पंचिंगसाठी तिने मला एक नंबर दिला आणि सांगितले हा तुझा यूजर आयडी . पासवर्ड तुला हवा तो घे. नंतर तिने मला एक टी शर्ट दिला व एक टोपी घालायला दिली. एक ॲप्रनही दिला. मी टी शर्ट घातला तो विजारीमध्ये आत खोचला. ॲप्रन घातला , केसांचा बुचडा बांधला आणि कामाला सज्ज झाले. बांगड्या, अंगठ्या, घड्याळे काहीही घालायचे नाही. शिवाय लोंबते कानातलेही घालायचे नाहीत असे मला जेमिने सांगितले. तिने माझी ओळख कार्मेन नावाच्या बाईशी करून दिली. आम्ही दोघींनी हस्तांदोलन केले. एकमेकींकडे बघून हसलो आणि आमची कामाला सुरवात झाली. ४-५ दिवसानंतर मला माझ्या नावाचा बिल्लाही मिळाला. टी शर्टाला हा बिल्ला अडकवायचा असतो. प्रशिक्षण असे वेगळे काहीच नाही. थेट कामाला सुरवात आणि काम करता करता मला सर्व गोष्टी समजल्या आणि मी प्रत्येक कामात तरबेज झाले. कार्मेनने मला सर्व काही व्यवस्थित सांगितले. कार्मेन ही प्रामाणिक आणि मेहनती आहे. इंगल्स स्टोअर मधला डेली विभाग हा खूप मोठा विभाग आहे. उत्पादन विभागात आम्ही तिघी होतो कार्मेन, मी आणि विकी. विकी अमेरिकन आणि कार्मेन मेक्सिको देशामधली होती. शिवाय डेलीमध्ये फिलीपाईन देशातल्या पण दोघी तिघी होत्या.एक बाई युरोपमधली होती. आमच्या पुढे सुशी बार, हॉट बार आणि सब बार आणि आमच्या मागच्या बाजूला सलाड बार होता. त्याच्या शेजारी कुकिंग विभाग . इंगल्स हे एक ग्रोसरी स्टोअर तर आहेच पण शिवाय या

स्टोअरच्या आत फ्रेश प्रोड्यूस मार्केट आणि स्टारबक्स आहे. कॅफे कॉर्नर आहे. तिथे सर्व जण बसून जेवतात, गप्पा मारतात. वायफाय फुकट असल्याने बरेच लोक लॅपटॉपवर आपापली कामे करताना बसलेली दिसतात.

## उत्पादनविभाग

उत्पादन विभागात .मी विकीबरोबर दोन दिवस व कार्मेनबरोबर २ दिवस काम करायचे. आमच्या तिघींची सकाळची शिफ्ट होती.आम्ही मांस घातलेले सँडविच बनवायचो. शिवाय सलाड, पिझ्झे बनवायचो. हे सर्व बनवताना आम्ही कच्चा माल आणण्या करता फ्रीजरमध्ये जायचो.हा फ्रीजर म्हणजे एक मोठी खोलीच होती. तिथे आम्ही सँडविचसाठी लागणारे ब्रेड आणायचो. शिवाय इतरही डबे आणायचो जसे की चॉकलेटपूडींग, व्हनिलापूडींग, मेयोनिज, उकडलेलीअंडी इ. इ. बरेच काही! काही सँडविच बनवायला जे स्लाईस ब्रेड लागायचे ते आम्ही स्टोअरमध्ये विक्री करता ठेवलेल्या रॅकमधून आणायचो. उदाहरणार्थ - white bread, Rye, Sourdough, hot dog bun.फ्रेश प्रोड्यूस मार्केट मधून आम्ही सँडविच बनवताना लागणारे ग्रीनलीफ लेट्युस आणायचो. शिवाय सलाड बनवण्यासाठी बेबी टोमॅटो, काकड्या, सिमला मिरची, द्राक्षे, आईसबर्ग लेट्युस आणायचो. चिकनसलाड बनवण्यासाठी आम्ही लाल कांदे व सेलेरी पण घ्यायचो.ज्या गोष्टी घ्यायचो त्यांची नोंद आम्हाला तिथे असलेल्या चार्टमध्ये लिहायला लागायची. आम्ही कार्ट घेऊन जायचो हा सर्व कच्चामाल आणण्यासाठी. त्याची एक यादी बनवायचो.कारण की फ्रीजर, फ्रेश प्रोड्यूस मार्केट हे सर्व स्टोअरमध्ये वेगवेगळ्या ठिकाणी होते. त्याकरता आमचे चालणेही बरेच होतअसे. फ्रीजरमध्ये जाताना आम्हाला कोट, टोपी, मफलर व हातमोजे ही घालावे लागत इतके प्रचंड प्रमाणात गार असायचे.सलाडमध्ये आम्हीअनेक प्रकारची सलाड बनवायचो. उदाहरणार्थ rotisserie chicken salad, pimento cheese, egg, ham इत्यादी. हे सर्व

पदार्थ बनवून ठेवण्यासाठी वेगवेगळ्या आकाराचे प्लॅस्टीकचे पारदर्शक डबे असायचे. त्याचे बॉक्सेस फ्रीजर होता त्या लाईनतच शेवटच्या बाजूला होते. त्यातले जितके हवे असतील तेही आणावे लागत. कामावर आल्यावर रॅकमध्ये ठेवलेले नाशिवंत डबे फेकायला लागत. नाशिवंत डब्याची तारीख म्हणजे ज्या दिवशीची सुरवात होते ती तारीख ठरलेली आहे. ते सर्व डबे फेकून दिल्यानंतर आम्ही कोल्डरूममध्ये जायचो. तिथले डबे घेऊन ते आम्ही रॅकमध्ये ठेवायचो. त्याकरता कोणकोणते डबे ठेवायचे आहेत त्याची एक यादी करून एक कार्ट घेऊन जावे लागे. हे सर्व डबे आम्हाला रॅकमध्ये नेमून दिलेल्या जागी ठेवावे लागत.अश्याप्रकारे हा रॅक भरायचो.हा रॅक डेली विभागाला लागूनच बाहेरच्या बाजूला होता. अर्धवर्तुळाकार व खालच्या बाजूला होता. डबे ठेवण्याकरता आम्हाला वाकावे लागे. तसेच कोल्डरूम मधला जो रॅक होता व त्यात काही कप्पे उत्पादन विभागासाठी आमच्या डेली मॅनेजर ने आम्हाला ठरवून दिले होते.

रॅक भरून झाला की आम्हाला दोन याद्या बनवाव्या लागत.एक यादी म्हणजे कोणकोणत्या प्रकारचे सँडविच आणि सलाड बनवावे लागणार आहेत आणि दुसरी यादी म्हणजे मांसाची व चीझची. वेगवेगळ्या प्रकारचे सँडविच बनवण्याकरता लागणारे मांसाचे प्रकार व ते किती प्रमाणात हवेत याची यादी. प्रत्येक प्रकारचे सँडविच व सलाड याचे कोल्डरूममधे डबे शिलकीत असायचे एक प्रमाण ठरवून दिले आहे.त्यानुसार पण एक यादी बनवावी लागते.म्हणजे शिलकीत असणारे डबे किती शिल्लक आहेत त्याप्रमाणे आजच्या दिवसात किती पदार्थ बनवावे लागणार आहेत त्याची यादी.सँडविचचे/सलाडचे नाव त्यापुढे शिलकीत असणारा आकडा लिहायचा आणि त्यापुढे बनवायचा आकडा लिहायचा असतो. उदाहरणार्थ क्लबसँडविच शिलकीत किती पाहिजेत याचे प्रमाण जर १० असेल आणि ५ डबे विक्रीकरता ठेवले असतील तर आम्हाला परत ५ सँडविच बनवावे लागतील. (विक्रीकरता ठेवलेले ५ म्हणजे उरलेले ५

आणि बनवायचे ५) म्हणजे १० चे प्रमाण कायम रहाते.प्रत्येक सँडविच बनवण्याकरता किती औंस मांस घालायचे हे ठरले आहे.त्याप्रमाणे जितके सँडविच बनवायचे त्याला गुणिले ठरवून दिलेले मांस. चीझही वेगवेगळ्या प्रकारचे लागते आणि त्याचेही प्रमाण ठरवून दिलेले आहे. उदाहरणार्थ - American white and yellow cheese, mozzarella cheese साधारण २ ते ३ औंस मांस प्रत्येक सँडविच साठी लागते.तर १ औंस चीझ लागते. मांस व चीझची यादी डेली सेक्शनच्या बाजूलाच असलेल्या मीट सेक्शनला द्यावी लागते व त्याप्रमाणे तिथले कामगार आम्हाला सर्व मीट आणि चीझ कापून द्यायचे.हे सर्व मीट व चीझ ते आम्हाला एका प्लॅस्टीकच्या डब्यात कापून द्यायचे व तो डबा आम्ही लगेचच कोल्डरूम मध्ये ठेवायचो.कारण की मांस उघड्यावर  ठेवले तर ते लवकर खराब होते. सँडविच आम्ही वेगवेगळ्या प्रकारचे बनवायचो. उदाहरणार्थ - Beechwood ham, Tuscan turkey, buffalo club, 3 pack combo, Teriyaki, Roast beef, Reuben, chiken breast, club with potato salad इत्यादी. याव्यतिरिक्त पिझ्झेपण बनवून ठेवायचो. त्याकरता आम्हाला फ्रीजर मधून पिझ्झेबेस आणायला लागायचे व त्या बेसवर घालण्यासाठीचे सर्व साहित्यही. पिझ्यामध्ये आम्ही बनवायचो ते प्रकार होते चीझ, सुप्रीम, पेपरोनी आणि पेपरोनी with सॉसेज. सर्व पदार्थ बनवून झाले की ते प्लॅस्टीकच्या डब्यात भरून त्यावर लेबल प्रिंट करून लावायचो. प्रत्येक पदार्थासाठीचे लेबल प्रिंट करायला त्या त्या पदार्थांचे प्रिंटकोडनंबर होते.ते नंबर टाईप करून लेबल प्रिंट व्हायचे आणि तेही डब्याच्या विशिष्ट जागी चिकटवावे लागत असत. हे सर्व कोडनंबर सवयीने पाठ झाले होते.

हे सर्व पदार्थ बनवताना खूप स्वच्छता पाळायला लागते.साधारण ४ पासून ते २०   सँडविच आम्ही प्रत्येक प्रकारचे बनवायचो.म्हणजे साधारण ५० ते १०० सँडविचेस होत असत.ते बनवण्यासाठी हातात ग्लोव्ज घालावे लागतात व ते वेळोवेळी बदलावे लागतात.

ओटाही प्रत्येक प्रकारचे सँडविच अथवा सलाड बनवून झाल्यावर सॅनिटाईज केलेल्या ओल्या फडक्याने पुसून घ्यावा लागतो. स्वच्छता राखण्यासाठी म्हणूनच आम्हाला केसाचे बुचडे बांधायला लागतात.काम करताना मोकळे केस सोडून चालत नाहीत. वेणी, पोनिटेल घालूनपण चालत नाहीत. कारण की पदार्थ बनवताना केसाचे गुंतवळ जाण्याची दाट शक्यता असते. हाताचा वापर होत असल्याने हातात अंगठ्या आणि बांगड्या घालायच्या नसतात. सलाड बनवताना मोठमोठाल्या घमेल्यात बनवावे लागते. एग सलाड बनवताना उकडलेली अंडी किसून घ्यावी लागतात तर हॅम सलाड बनवताना ते फूड प्रोसेसरमधून बारीक करून घ्यावे लागते.सलाड कालवण्यासाठी बाकीचे जिन्नस घालून शिवाय मेयोनिज पण घालून ते कालवावे लागते फ्रीजर मधले आणलेले मेयोनिज प्रचंड गार असते.कालवताना हाताला चटके बसतात. त्याकरता आम्ही डबल ग्लोव्ज घालायचो.चिकन सलाड करण्यासाठी चिकन, लालकांदा, व सेलरी कापण्यासाठी धारदार सुऱ्या लागतातच. शिवाय सँडविचेच बनवण्यासाठी ब्रेड कापावा लागतो तोही धारदार सुरीने.बाकीचे काही सँडविच व इतर फळे कापण्यासाठी छोट्या सुऱ्या लागतात. विक्रीसाठी आम्ही जे डबे अर्धवर्तुळाकार जागेमध्ये नेमून दिलेल्या जागेवर ठेवायचो तिथे जाऊन अधुनमधून तिथले डबे विकले गेले आहेत का ते बघायला लागायचे. तिथल्या रिकाम्या झालेल्या जागेवर परत कोल्डरूममध्ये बनवून ठेवलेले डबे आणून ठेवायला लागायचे. याकरता एक छोटी डायरी घेऊन त्यात ठेवायला लागणारे पदार्थांची नावे लिहून ते डबे कोल्डरूममधून आणायला कार्टही आणायला लागायची.काम झाले की परत ती कार्ट जागेवर नेवून ठेवायला लागायची.

## जास्तीचे काम

उत्पादन विभागातल्या कामाशिवाय आम्हाला बाकीची जास्तीची कामे पण करायला लागायची. डेलीसेक्शनला लंचटाईममध्ये खूप गर्दी होतअसे.

तिथे हॉट बार, एशियनबार आणि सबबारमध्ये ज्यांची नेमणूक व्हायची त्यांना मदतीसाठी आम्हाला लंचटाईममध्ये जावे लागायचे. तिथल्या बायका नोकरी सोडून निघून गेलेल्या किंवा/त्यांना येऊ नका असे सांगितल्यामुळे न येणाऱ्या बायका नसल्या की तर आमचे जास्तीचे काम खूपच वाढायचे. शिवाय ब्रेक फास्टला पण कस्टमर येत असत. तेव्हा पण मदतीसाठी जायला लागायचे. 'कस्टमरफर्स्ट ' या नियमाप्रमाणे हातचे काम सोडून आधी त्यांच्याकडे लक्ष द्यावे लागे. इथे लंचटाईमला जेवणासाठी ५ डॉलर्स मध्ये ३ जिन्नस ठेवलेले असतात. त्यात फ्राईडचिकन असते आणि दोन पदार्थ व्हेजी असतात. त्यात मॅकरोनी चीझ, उकडलेले बीन्स,आणी मॅश्डपोटॅटो असत. काहीवेळेला वेगळे पदार्थही असत. गोड पदार्थांमध्ये ॲपल किंवा Strawberry Pie (स्ट्रॉबेरीपाय) असे पदार्थ असतात. थर्मोकोलच्या ३ कप्पे असलेल्या डीशमध्ये हे पदार्थ आम्ही भरून देत असु. त्यावर प्रिंटकोडप्रमाणे लेबल तयार करून ते डीशला चिकटवून द्यावे लागतात. यामध्ये काहीवेळेला कस्टमर जेवण न घेता फक्त फ्राईडचिकन घरी नेण्यासाठी घेतात. हे चिकनविंग्ज, ड्रमस्टिक (तंगड्या) ,थाय ब्रेस्ट याप्रमाणे जसे पाहिजे तसे द्यायचो. इथे फ्राईड चिकनला तूफान मागणी असते. तसेच रोटिसिरी चिकनसलाड पण तूफान प्रमाणात विकले जाते. एशियनबारमध्ये पण वेगवेगळ्या मांसाचे किंवा बिनामांसाचेपदार्थ ठेवलेले असत. सबमध्ये वेगवेगळ्या प्रकारच्या मांसाच सब थाय आणि सबमरिन सँडविच कस्टमरला विचारून त्यांच्या समोर बनवून द्यायला लागतात. याशिवाय डेली सेक्शनला वेगळी कॅशियर नेमून दिलेली होती. तिच्या गैरहजेरीत आम्हाला मदतीसाठी जावे लागायचे.

## खाण्यापिण्याची मजा

डेलीमध्ये जे पदार्थ बनतात त्याची चव घ्यायला आम्हाला मुभा असायची पण कोणाच्या देखत खाता यायचे नाही. कस्टमर आपल्याला खाताना बघत नाहीत ना त्याच्याकडे लक्ष द्यायला लागायचे. त्यामुळे काम

करताकरता लपूनछपून खायचे असा नियम आहे.त्याकरता आम्ही टेबलाच्या खाली वाकून खायचो अथवा कोल्डरूममध्ये जाउन खायचो. मी शुद्ध शाकाहारी असल्याने मला जास्त काही खाता यायचे नाही. मी फळे चिरताना फळे खायचे. शिवाय स्लाईसब्रेडला क्रीम लावून खायचे, किंवा टोमॅटो काकड्या, कूकीज खायचे.काहीवेळा बेकरीत काम करणाऱ्या बायका आम्हाला ताज्या बनवलेल्या कूकीज किंवा केक आणून द्यायच्या. ताजे खाल्यावर काम करताना हुशारी यायची. फ्रूटबारमध्ये काम करणाऱ्या बायका खूप मोठमोठाली फळे कापायच्या.विक्रीकरता फळे कापून झाली/उद्याच्या विक्रीकरता शिलकीत कापण्या पुरती झाली की उरलेल्या फळांच्या फोडी आम्ही सर्वजणी खात असू.

त्यात टरबूज, कलिंगड, द्राक्षे, स्ट्रॉबेरी/ब्लुबेरी असायची. उत्पादन विभागातले आमचे पदार्थ बनवताना मी फळे खायचे. शिवाय गोल्डफिश/ड्रायफ्रुट्स खायचे. जेवणाकरता मी घरी बनवून आणलेला डबा असायचाच पण काही वेळेला सबबारमधला व्हेजीसब माझा मीच बनवून घ्यायचे. सबमध्ये combo sub असेल तर त्या बरोबर कोक व बटाट्याचे चिप्स असायचे. शिवाय काही वेळेला मी एशियनबार मधले व्हेजनुडल्स अथवा ऑर्डरप्रमाणे ताजा बनवलेला पिझ्झा खायचे. तिथे काम करणाऱ्या बायका मी शुद्ध शाकाहारी कशी काय राहू शकते ते पाहून अचंभित व्हायच्या!

## मी बनवलेली बटाटाभजी - एक यशस्वी प्रयोग

एक बाई  इंगल्सच्या डेली विभागात कामाला होती. तिने एकदा एक पदार्थ केला आणि तो इंगल्सच्या हॉटबारमेनूमध्ये ठेवला. मी कार्मेनला विचारले ‘आपण आपला पदार्थ इथे केला तर चालतो का?‘ तर ती हो म्हणाली नंतर मी डेलीमॅनेजर जेमिलाही विचारले. ती म्हणाली चालेल. मला

हॉटबारमध्ये वेगवेगळे मेनू ठेवायला नक्किच आवडतील. मग ती म्हणाली की तुला जर तुझी रेसिपी करायची असेल तर ६ ला यायला लागेल. माझी कामाची वेळ ८ पासून सुरू होत होती. जेमी म्हणाली तुला इतक्या लवकर जमणार नसेल तर तू ७ वाजता ये.  ब्रेंडा कुकींगसाठी असते.तिला विचारले की या मोठ्या इलेक्ट्रिक फ्रायर मध्ये बटाट्याच्या चकत्या तळल्या जातील का? तर ती हो म्हणाली. विनायकला विचारले तर तो म्हणाला ज्या अर्थी चिकनवडा खूप खपतो तर भजी लोकांना नक्कीच आवडतील. तू भजीच कर. पण एक प्रश्न होता की इंगल्स हेअमेरिकन ग्रोसरी स्टोअरआहे, तिथे कुठे बेसन मिळणार ? तर मी मैदा (All purpose flour) वापरायचे ठरवले.  त्या दुकानात चक्क मला एका कंपनीचे तांदुळाचे पीठही दिसले. खूप कमी तिखट असलेले लाल तिखट आणि जिऱ्याची पावडरही इंगल्समध्ये होती.बटाटा भजी करण्याचे निश्चित केले आणि एका शनिवारी हा प्रयोग यशस्वी झाला. तिथे सोलाणेपण चांगले धारदार होते. सर्व साहित्य जमा केले. तयारी केली. बटाट्याचे पातळ काप केले तर तिथे काम करणाऱ्या काही बायकांनी ते कच्चे कापच खाल्ले ! जिथेही लोक मासाचे तुकडे पचवतात तिथे बटाट्याचे काप तर किस झाडकी पत्ती ! डॉन मला म्हणाली की मला असे कच्चेकाप खूप आवडतात.

बटाटा भज्यांची तयारी झाली. पीठ कालवले आणि तिथल्या बायकांना चव घ्यायला सांगितले. कारण की अमेरिकन लोकांना तिखट मीठाची चव जास्त आवडत नाही.त्यामुळे आळणी चव असलेले पीठ भिजवले. ब्रेंडा म्हणाली की माझे चिकनफ्राय करून झाले की तु भजी सोड. मला त्या इलेक्ट्रिक फ्रायरची जास्त कल्पना नसल्याने विचारले असता तिथल्या बायका  म्हणाल्या की जनरली ३२५ फॅरनहाइटवर आम्ही फ्राय करतो.  चिकन फ्राय झाल्यावर मी बटाटा भजी एकेक करत सोडत गेले. साधारण दीड किलो बटाट्याची भजी ३ मिनिटांमध्ये तळली गेली. तळून बाहेर काढल्यावरअर्थातच चव घेतली

गेली आणि मग हॉटबारमध्ये एक वाडगा भज्यांचा ठेवला गेला. त्या सर्व नॉनवेजपदार्थां मध्ये बटाटा भजी खूप उठून दिसत होती. कस्टमर विचारत होते कोणता पदार्थ आहे.ब्रेंडा सांगत होती ही पोटॅटोफ्राय आहेत. त्यामध्ये काय जिन्नस आहेत असेही लोक विचारत होते. नमुन्याला भजी दिली जात होती.काहींनी जेवणामध्ये बाकीच्या पदार्थां बरोबर भजीही घेतली.

बटाटाभजी तळून झाल्यावर मी माझे काम करायला घेतले.नंतर काहीवेळाने लंचटाईममध्ये जेवायला गेले. तिथे नंतर ॲना आली.ती म्हणाली तुझे पोटॅटो सगळ्यांना आवडत आहेत! जेवणावरून आले तर ब्रेंडा म्हणाली.भजी संपत आली आहेत. अजून एक मोठा लॉट तळून ठेव. मग परत अशीच साधारण दीड ते २ किलो बटाट्याची भजी तळली.आणि नंतर ती वाडग्यातून हॉटबारमध्ये ठेवली गेली. मला त्या दिवशी खूप आनंद झाला होता. स्टोअर्स मधले इतर मॅनेजर्स चविला म्हणून एकएक घेऊन खात असताना दिसले. दुसऱ्या लॉटमध्ये मात्र मी तिखट पहिल्यापेक्षा जरा जास्तच टाकले.प्रयोग तर छानच यशस्वी झाला पण दमणूक मात्र प्रचंड झाली. सर्वच्यासर्व तयारी सकट साधारण ४ ते ५ किलोची भजी मी एकटीने केली. मनात खूप होते की एकेक करत जेव्हा परवानगी मिळेल त्या दिवशी आपले पदार्थ करायचे, पण नंतर तो विचार सोडून दिला.कारण की नोकरी ८ तास उभे राहून करण्याची होती आणि त्यात जास्तीची दमणूक न झेपणारी होती.भजी करण्याचा फक्त एक प्रयोग होता. त्याचे वेगळे पैसे मला मिळणार नव्हते.

## इन्स्पेक्शन

इंगल्स स्टोअरचे इन्स्पेक्शन दोन प्रकाराने होते. फूडइन्स्पेक्टरआणि डिस्ट्रिक्ट मॅनेजर इन्स्पेक्शन करायला येतात. त्यापैकी फूड इन्स्पेक्टर येतो तो डेलीविभाग चेक करतो. स्वच्छता किती आहे ते बघतो.याशिवाय पदार्थांची

क्वालिटी ही तपासतो.पदार्थ हे नेमून दिलेल्या ठराविक तापमानात ठेवले आहेत की नाहीत, कापलेले मांस उघड्यावर ठेवले आहे  का, कामगारांनी हातात ग्लोव्ज घातले आहेत का, पुसायची ओली फडकी इतरत्र अशीच पडलेली आहेत का, नाशिवंत माल तसाच कोल्डरुममध्ये पडून आहे का, बनवलेला पदार्थ विक्रीसाठी ठेवलेला नासला नाहीना, असे बरेच काही तपासून डेली सेक्शनला रेटींग मिळते. डिस्ट्रिक्ट मॅनेजरही अश्याप्रकाराने डेली विभागाची तपासणी करतो. या व्यतिरिक्त तो सर्व स्टोअर तपासतो. त्याच्या बरोबर स्टोअर आणि डेली मॅनेजर वहीपेन घेऊन जातात आणि तो जे काही सांगेल ते वहीत उतरवून घेतात. दर महिन्यात इन्व्हेन्टरी होते. यामध्ये स्टोअर फायद्यात आहे की तोट्यात आहे ते कळते. डेलीमध्ये कोणते पदार्थ किती खपतात हेही तपासले जाते.याशिवाय उत्पादन विभागात वेगळा पदार्थ ठेवायचा का हे पण ठरते. जर ठरले तर मॅनेजर आम्हाला रेसिपी लिहून त्याची प्रिंट देतात व  मग आम्ही त्याप्रमाणे पदार्थ बनवतो.

## भेटवस्तुंची देवाणघेवाण

अमेरिकेत ख्रिसमसला एकमेकांना भेटवस्तु देतात. इंगल्समध्ये ख्रिसमसला इच्छा असेल त्याप्रमाणे सरप्राईज गिफ्ट देतात. त्या करता नावे द्यायची व कोणाला भेट देणार असु त्याचे नावही द्यायचे असते. मित्रमैत्रिणींना एकमेकींच्या आवडीनिवडी माहिती असतात त्याप्रमाणे तशा भेटवस्तू एकमेकांना देतात. एके वर्षी हेडी या  मेक्सिकनबाईला एक भेट वस्तू मिळाली ती होती मेकअप बॉक्सची. ती भेट मिळताच ती खूपच हरखून गेली होती. बेकरीमध्ये काम करणाऱ्या तिच्या एका मैत्रिणीने ही भेट तिला दिली होती. हेडीला चेहऱ्यावर रंगरंगोटी करायला खूपच आवडते. ती रोजच्यारोज तिच्या चेहऱ्यावर वेगवगळे मेकअप करायची आणि तिला ते छान दिसायचे. मी यामध्ये कधीच

भाग घेतला नाही. मी तिथल्या सर्व मैत्रिणींना वेगवेगळ्या भेटवस्तू दिल्या. त्या म्हणजे तुळशीबागेतले कानातले आणि वेगवेगळ्या पर्सेस घेतल्या.मी त्या भारतभेटीमध्ये विकत घेतल्या होत्या. एके वर्षी मी सगळ्यांना लोंबते कानातले घेतले होते. हे कानातले मी तृप्ती मोरे कडून विकत घेतले होते.ती कानातले खूप छान बनवते. तेही सर्वांनाच आवडले.शिवाय कार्मेन व विकीला मी त्यांच्या वाढदिवसाच्या दिवशी केक, फुगे, शुभेच्छापत्रे दिली आहेत. त्यांच्या चेहऱ्यावरचा आनंद बघताना मला खूपच छान वाटायचे. विकी दर ख्रिसमला सर्वांना भेट वस्तू द्यायची.त्यामध्ये तिने मला एकदा पायमोजे व हातमोजे दिले होते. एकदा कानातले व एक मोठा फुलाफुलांचा नक्षीअसलेला मग दिला होता. इंगल्स स्टोअर फक्त एकच दिवशी बंद असते. तो दिवस म्हणजे २५ डिसेंबर.बाकी सर्वदिवस इंगल्स स्टोअर चालू असते.२४ डिसेंबरला सर्वांना थोड्या तासांकरता काम देतात व खाण्याकरता कूकीज, केक व कोक देतात. हे सर्व वातावरण बघताना मला खूप छान वाटायचे.

--------*--------

# २१) खग्रास सूर्यग्रहण

सूर्यग्रहण पहायला मिळेल असे काही आमच्या ध्यानीमनी नव्हते. अमेरिकेतल्या काही राज्यांमधून ते दिसणार होते. मागच्याच आठवड्यात कळाले की Brevard शहरात खग्रास सूर्यग्रहण दिसणार आहे. Brevard शहर आम्ही राहत असलेल्या Hendersonville शहरापासून साधारण अर्ध्या तासाच्या कार ड्राईव्ह वर आहे जिथे विनायक ऑफीसला जातो. सूर्यग्रहण बघण्याच्या काचा आम्हाला विनायकच्या ऑफीसमधून मिळाणार होत्या. २१ ऑगस्ट २०१७ हा दिवस आमच्या दोघांच्या आयुष्यातील खूप आकर्षक दिवस ठरून गेला. सोमवारची मी रजा टाकली होती आणि विनायक बरोबर सकाळी सर्व तयारीनिशी मीही निघाले. विनायकचे ऑफीस आणि इंगल्स स्टोअर्स हे समोरासमोर आहेत. अगदी समोरासमोर नाही पण ऑफीस मधून २ ते ३ मिनिटे ड्राईव्ह केल्यावर एक मोठा चौक लागतो. हा चौक ओल्यांडल्यावर सरळ गेले की इंगल्स स्टोअर्स लागते जिथे मी काम करते पण मी काम करते ते आम्ही राहत असलेल्या शहरात. आमच्या घरापासून १० मिनिटांच्या अंतरावर. या इंगल्स स्टोअर्सची २०० ग्रोसरीस्टोअर्स आहेत २ ते ३ राज्यांमध्ये मिळून. या स्टोअर्समध्ये स्टारबक्स कॉफी आहे. शिवाय इथला कॅफे इतका काही छान आहे की इथे येऊन कोणीही कितीही वेळ बसावे. काहीही करावे. वाचावे, लेखन करावे, लॅपटॉपवर काम करावे.

खग्रास सूर्यग्रहण बघण्याच्या टप्प्यात विनायकचे ऑफीस आणि इंगल्स स्टोअर्स असल्यानेच या योग जुळून आला होता. आम्ही सकाळी निघालो ते विनायकने मला आधी इंगल्स मध्ये सोडले आणि तो कंपनीत गेला. सुमारे १ वाजता मला विनायकने ग्रहण बघण्याच्या काचा आणून दिल्या. त्या आधी मी ९ ते १ कॅफेत बसून होते. ९ ते ११ वहीत बरेच काही लिहिले. ब्लॉगवरचे

काही लेख अपूर्ण आहेत ते मला संपवायचे आहेत. लिखाणासाठी जो निवांत वेळ लागतो तो आज मला सूर्यग्रहणाच्या निमित्ताने मिळाला होता. ११ वाजता मी व्हेज सँडविच खाल्ले. combo sub मध्ये सँडविच बरोबर कोक आणि बटाटा चिप्सही मिळतात. जेवण झाल्यावर मी सूर्यग्रहण पहाण्यासाठी इंगल्सच्या पार्कींग लॉट मध्ये एका झाडाखाली येऊन बसले. बरेच जण झाडाखाली अंथरूणे पसरून पहुडली होती. काही जण खुर्च्या आणून त्यावर बसले होते. तर काही जण कार मध्येच कूलींग लावून बसले होते. चित्रपटाची सुरवात झाली. किती छान दिसतोय सूर्य ! मनाशीच बोलले मी ! विस्तीर्ण लांबवर पसरलेले आकाश आणि काचेतून सूर्याचा गोळा एखाद्या श्रीखंडाच्या गोळी सारखा पिवळा दिसत होता. आजुबाजूला काळे निळे, तर काही धुरकट पांढरे ढगही दिसत होते. चंद्राची सूर्यावर सावली पडायला सुरवात झाली. ही चंद्राची काळी चकती हळूहळू पुढे सरकत होती. अधून मधून मी विनायकशी फोनवर बोलत होते. विनायकच्या ऑफि मधले सर्वजण काम करता करता अधून मधून बाहेर येत होते आणि ग्रहणाला बघत होते. वेदर पार्टली क्लाऊडी असल्याने काळे निळे ढग ग्रहणावरती येऊन परत बाजूला होत होते, असे दृश्यही बघायला मिळाले. सूर्य तर खूपच देखणा दिसत होता. मी अधून मधून सूर्यग्रहण बघत होते तर अधून मधून झाडाखाली सावलीत बसत होते. असा खेळ दीड तास चालला. २ वाजून ३० मिनिटांनी एक मोठा Climax झाला. Climax तर मध्यंतराच्या आधीच संपला. आता स्टोरीत काही अर्थ उरला नाही म्हणून लोक परतायला लागले. चंद्राने सूर्याला स्पर्श केला तेव्हा दुपारचा १ वाजून ८ मिनिटे झाली होती. चंद्राने मुहूर्त अजिबात चुकवला नाही. स्पर्श करून जेव्हा तो पुढे सरकला तेव्हा तर सफरचंद दाताने तोडून थोडा भाग खाल्यासारखे कसे दिसते तसेच चित्र दिसले. Just like apple product symbol !

Climax जेव्हा जवळ यायची वेळ आली तेव्हा तर सर्वजण श्वास रोखून सूर्याला आणि त्यावरच्या चंद्राच्या चकतीला पाहत होते. थोडे थोडे

करत सूर्य झाकला जात होता. आता अगदी काही क्षणच उरले होते. सरते शेवटी बांगडी फुटलेल्या बारीक काचेचा तुकडा कसा दिसतो तसाच सूर्याचा तुकडा दिसला. आणि नंतर हळूहळू एक टिंब आणि नंतर काही सेंकदातच सूर्य पूर्णपणे झाकला गेला. तेव्हा तर 'ये पल तो यही थम जाए तो अच्छा होगा ' अशीच माझ्या मनाची अवस्था होऊन गेली. संध्याकाळ नाही तर पूर्णपणे अंधार ! रात्रच जणू ! आकाशात कुणीतरी टॉर्च घेऊन उभे आहे असेच वाटत होते. आता सूर्याकडे काचेशिवाय बघता येत होते. जेव्हा चंद्र उजवीकडून डावीकडे सरकला मात्र !अहाहा ! सर्वांना हिऱ्याच्या अंगठीचे दर्शन झाले. सूर्याची वळ्यासारखी दिसणारी कड आणि मधोमध सूर्याचा तेजस्वी तेजाचा हिऱ्यासारखा चमकणारा खडा ! काय ही निसर्गाची किमया! देवा तुझी करणी अगाध आहे रे ! खूप गहिवरून आले मला. अश्रू गालावरून ओघळले. आता सूर्याची कोर उजव्या बाजूने दिसायला लागली आणि नंतर वाढत गेली. अडीचला मी परत कॅफेत येऊन बसले आणि हा अवर्णनीय अनुभव वहीत उतरवला. पावणेचारच्या सुमारास मी परत पार्कींग लॉटमध्ये गेले आणि झाडाखाली उभे राऊन सूर्याला परत डोळे भरून पाहून घेतले. आता चंद्राची सावली कमी कमी होत गेली आणि परत सूर्याचा तप्त पिवळा गोळा दिसायला लागला. चारच्या सुमारास कॉफी प्यायली आणि विनायकची वाट पाहत परत कॅफेत येऊन बसले. निसर्गाचे चित्र बदलून रपारप पाऊस पडायला सुरवात झाली. घरी परत येताना वाहतूक मुरंबा ! आमच्या दोघांच्या आयुष्यामध्ये सूर्यग्रहणाचा अवर्णनीय सोहळा पहाण्याचा जबरदस्त योग जुळून आला होता तर !!!



# २२) हेंडरसनविल – एक टुमदार शहर

नॉर्थ कॅरोलायना मध्ये आम्ही सुरवातीला समुद्रकिनारी विल्मिंग्टनला राहिलो.तिथले जवळपासचे सर्व समुद्रकिनारे बघितले. जेव्हा पर्वतरांगांकडे प्रस्थान केले ते म्हणजे नॉर्थ कॅरोलायना राज्याचे दुसरे टोक आहे.हेंडरसनविल हे एक टुमदार आणि कमी लोकवस्ती असलेले छोटे शहर. हे शहर खूपच निसर्गरम्य आहे.जिथे पहावे तिथे डोंगरच डोंगर आहेत. रस्तेपण सरळसोट नाहीत. या शहरात उंचसखलपणा असल्याने चढउताराचे रस्ते बरेच आहेत. कधीकधी नागमोडी रस्ते. इथली हवा कोरडी पुण्यासारखी ! आमच्या दोघांचे जन्मगाव पुणे असल्याने आम्हाला कोरडी हवा जास्त मानवते. इथला प्रत्येक ऋतु खूपच छान अनुभवायला मिळाला. पानगळीमध्ये पानांचे रंग बदलतात. त्यामुळे हे शहर पानगळीच्या ऋतुमध्ये खूपच खुलून दिसायचे.छोट्या पठारांवर तर पिवळारंग पसरलेला असायचा. हिवाळ्यात बोचरे वारे चांगलेच बोचायचे. हे शहर उंचावर असल्याने हवा भरपूर खेळती राहायची.उन्हाळ्यात कधीही कूलर लावावा लागला नाही. स्नो पडला की छोट्या पठारांवर आणि दुरवर दिसणाऱ्या डोंगरांवर शुभ्र पांढरा स्नोचा रंग ऊन पडले की थोड्या वेळेकरता चमकत असे. मुसळधार पाऊस जेव्हा पडायचा तेव्हा डोंगरावरचे पाणी खाली वाहून जायचे पण जेथे उथळ जागा असेल तिथे ते खूप साचून राहायचे.त्यामुळे सखल भागात पूर यायचा.

आम्ही जेव्हा दुसऱ्या अपार्टमेंटमध्ये शिफ्ट झालो ते डोंगरावर होते.घराच्या बेडरूममधून सूर्यास्त दिसायचा. एकही दिवस असा गेला नाही की आम्ही सूर्यास्त पाहिला नाही.सूर्यास्त होण्याआधी आकाशातले रंग क्षणाक्षणाला बदलायचे. त्यातून त्यावेळी छोटेमोठे ढग जमा झाले असतील

तर ते रंग ढगांमध्ये घुसायचे व रंगीत चित्र तयार व्हायचे. हवामानतज्ञ लीरिंगरला मी सूर्यास्ताचे वआकाशातील रंगांचे फोटोज पाठवायचे. हे फोटोज तो त्याच्या फेसबुकवरच्या पेजवर अपलोड करायचा. विल्मिंग्टनचे केबल चॅनलचे क्षेत्र आमच्या इथे नसल्याने तो वेदरशॉट ऑफ द डे(Weather Shot of the Day )मध्ये मी पाठवलेले फोटोज दाखवू शकायचा नाही. मात्र एक फोटो त्याने दाखवला. त्याला तो फोटो खूपचआवडला होता. पण तो दाखवलेला फोटो मला बघता आला नाही म्हणून त्याने मला त्याचा स्क्रीनशॉट पाठवला. एकदा ढग एकावर एक येत होते आणि रंगही बदलत होते. खूप नयनरम्य आणि वेगळेपण होते म्हणून तो फोटो मी पाठवला होता. काही वेळेला खूप छोटेछोटे ढग एका मागोमाग एक तयार होत असत. बरीच इंद्रधनुष्य पाहिली आहेत.

हेंडरसनविलचे डाऊनटाऊन खूप छान होते. आम्ही दोघे विकेंडला एकदिवस इथल्या फूटपाथवरून चालायचो. बसायला मधे बाकडी होती. फूटपाथला लागून दुकाने व उपाहारगृहे होती. काही उपाहारगृहातून बाहेर फूटपाथवर टेबले व खुर्च्या मांडलेल्या होत्या. तिथे माणसे बसून जेवत. ऊन लागू नये म्हणून गोलाकार टेबलावरती कापडी छत्र्या होत्या. वेटर ऑर्डर घेऊन जाई व परत सर्व्ह करायला येई. फूटपाथला लागूनच कार पार्किंग होते. सप्टेंबर महिन्यात लेबरडेला इथे ॲपल फेस्टिवल भरे. जवळच्या शहरातून इथे सफरचंद विकायला येत. शिवाय इतर खाण्यापिण्याचे स्टॉलपण असत. ऑर्केस्ट्रा पण छान असायचा. त्या गाण्यांच्या रिदमवर हेलकावे घेत लोक गर्दी करून उभे राहत. आम्ही पण उभे राहायचो आणि तिथून हालूच नये असे वाटायचे.सफरचंदाचे सर्वात जास्त पिक  हेंडरसनविलमध्ये होते म्हणूनच या शहराला ॲपलकाऊंटी असे म्हणले जाते.या जत्रेत लहानमुलांपासून म्हाताऱ्या माणसांपर्यंत सर्व सामील होत. बाकीच्या  सुशोभित वस्तुंचे स्टॉल लावले जायचे.लहान मुलांकरता वरखाली होणारे पाळणे तर काही पाळणे एकाच दिशेने फिरणारे असत.

हेंडरसनविलच्या आजूबाजूच्या शहरांमध्ये जाण्याचे रस्तेही असेच डोंगराळ प्रदेशातून होते.असे हे निसर्ग रम्यशहर आमच्या दोघांच्या कायम लक्षात राहील असेच आहे! आम्ही दोघे तर या शहराच्या प्रेमात पडलो आहोत.



.

.

